


नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**








# नवभारत

वर्ष ११ वें ] फेब्रुवारी १९५८ [ अंक ५



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष अकरावें
अंक पांचवा

फेब्रुवारी
१९५८

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर

प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, ‘नवभारत’ मासिक,
‘गणेश भुवन’ २७६, तेलंग रोड, मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ‘ नवभारत ’ मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

# 'नवभारत' मासिक, फेब्रुवारी १९५८

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे.— का. सं. ]

**प्रा. पां. ना. कुलकर्णी:** धारवाड येथील कर्नाटक कॉलेजांतील मराठीचे प्राध्यापक.

**प्रा. सदाशिव आठवले:** कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजांतील इतिहासाचे प्राध्यापक.

**प्रा. श्रीमती हेमलता आचार्य:** नाशिक येथील हं. प्रा. ठा. कॉलेजांतील समाजशास्त्राच्या प्राध्यापिका.

**प्रा. ग. वा. तगारे:** कोल्हापूर येथील एस्.एम्.टी.टी. कॉलेजांतील शिक्षणशास्त्राचे प्राध्यापक, भाषाशास्त्र, शिक्षणशास्त्र व संतवाङ्मयावरील लेखक.

**प्रा. र. चिं. बडवे:** नडियाद येथील जे. जे. कॉलेजांतील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक.

**प्रा. व. म. सिरसीकर:** पुणें येथील स. प. कॉलेजांतील राज्यशास्त्राचे प्राध्यापक, राज्यशास्त्रावरील ग्रंथलेखन.

---












श्री. रोजे मार्‌तँ द्यु गार्द: अनु. प्रा. व. म. परांजपे

# आंद्रे जीद : १ :

[ आंद्रे जिद व रोजे मार्‌तँ द्यु गार्द हे दोघे आधुनिक फ्रेंच वाङ्मयांत फार श्रेष्ठ लेखक गणले जातात. दोघेहि नोबेल पारितोषिकाचे मानकरी. जिदबरोबरच्या पसतीस वर्षांच्या सहवासांत रोजे जिदला फार जवळून पाहूं शकला. एक चाहता, जिव्हाळ्याचा स्नेही आणि निर्भिड टीकाकार अशा तिहेरी भूमिकांतून जिदचें अंतरंग उकलून दाखविणारें, Notes on Andre Gide हें पुस्तक रोजे मार्‌तँ द्यु गार्दनें लिहिलें आहे. त्याचा संक्षिप्त अनुवाद येथें केला आहे. ले. ]

## जिद्‌ची पहिली भेट

नोव्हेम्बर १९१३

शेवटीं आज एकदां आंद्रे जिद्‌च्या भेटीचा योग आला.

गेल्या रविवारीं, 'नुव्हेल रव्ह्यू फ्रांसेज'च्या लेखकांच्या मेळाव्याला, निमंत्रित म्हणून मी गेलो होतो.

माझें 'ज्यां बार्वा' (Jean Barois) नुकतेंच प्रसिद्ध झालें होतें. आणि ज्या उत्सुकतेनें प्रत्येकजण माझ्याभोंवतीं गर्दी करून त्याबद्दल माझ्याशीं बोलत होता, त्यामुळें मीहि जरा भांबावून गेलो होतो, पण मनांत मात्र स्वतःवर खूष होतो. माझें पुस्तक मोठें वैशिष्ट्यपूर्ण आहे, अशी ग्वाही प्रत्येकजण देत होता, आणि तरीहि मला असें सारखें वाटत होतें, कीं यांच्यापैकीं कुणीच तें पुस्तक नीट असें वाचलें नसावें. प्रथम 'ऑंरी घेऑं' (Henri Gheon) भेटला. त्यानें माझ्यावर स्तुतीचा वर्षाव केला. पुढें सरकलों, तो 'पॉल फार्ग्यू' (Paul Fargue) नें गांठलें. त्याचें तें उभट पण टेंगुळ आल्यासारखें कपाळ आणि निमुळती होत गेलेली दाढी, यामुळें त्याच्या चेहऱ्याला अंड्याचा आकार आला आहे. माझें 'बार्वा' एका रात्रींत वाचून काढल्याचें, मोठ्या प्रौढीनें त्यानें मला सांगितलें. स्वतःच्या वाचनाचें त्यानें जें वर्णन केलें तेंच असें कीं त्यांतून त्याच्या खोलींतला मंद गुलाबी प्रकाश, उबदार बिछाना, रात्रीची शांतता, तंबाखूचा मादकपणा, आणि माझ्या कादंबरीचें आकर्षण या सगळ्याचें एक धुंद करून टाकणारें चित्र डोळ्यांसमोर तरळलें......

आम्ही बोलत होतो, इतक्यांत दार उघडलें. निवाऱ्यासाठीं चर्चमध्यें शिरणाऱ्या एखाद्या भिकाऱ्याप्रमाणें दिसणारी एक व्यक्ति आंत शिरली. डोक्यावरची जुनाट हॅट कपाळावर खालीं ओढल्यानें त्याचे डोळे कांहीं दिसत नव्हते. नोकरीधंदा सुटल्यानें, अर्धपोटी दिवस कंठणाऱ्या एखाद्या म्हाताऱ्या नटासारखा दिसत होता तो. नशिबानें गोता दिल्यानें, कुठल्यातरी धर्मशाळेंत राहून आयुष्य काढणाऱ्या, दुर्दैवी मुशाफिराशीं त्याचें फार साम्य दिसत होतें. किंवा, तुलनाच करायची तर,... एखाद्या निवृत्त भिक्षूसारखा तो दिसत होता, असें म्हटलें तर ? आणि तो सुद्धां, ज्याचें मन त्याला खात आहे, असा निवृत्त भिक्षू ! ... पण, सगळेजण त्याच्या स्वागतासाठीं अहमहमिकेनें पुढें होत आहेत... मासिकाशीं याचा निश्चितच कांहींतरी संबंध असला पाहिजे. त्यानें आपली हॅट आणि क्लोक काढून ठेवला. मूळच्याच हेंगाड्या शरीरावर त्याचा गबाळा, विरलेला सूट कांहीं नीट बसत नाहीं त्याला. सुरकुतलेल्या, लोंबणाऱ्या कॉलरमधून








चर निघालेली त्याची मान एखाद्या म्हाताऱ्या मक्ष्याच्या मानेसारखी दिसत आहे. डोक्याला टक्कल पडत चाललें आहे आणि असलेले केंस हळूहळू पांढरे होऊं लागले आहेत. त्याचा तो मंगोल छाप पसरट चेहरा, त्यावरील चामखिळांनी अधिकच कुरूप दिसतो. तसा चेहरा ठसठशीत आहे पण एकूण ओघळलेपणाच जास्त वाटतो. खप्पड गाल, अर्धवट वाढलेली दाढी, घट्ट मिटलेले, पाकळयांसारखे नाजूक ओंठ, पापण्याखालून भिरभिरणारे डोळे – त्यांत विशेष धिटाई दिसत नाहीं. एखादेवेळीं नजरेंत चटकन हांसूं तरळतें, – पण त्यांतहि गोडवा नाहीं, – बालिश, मिस्किल, बरेचसें मेदरट आणि ओढूनताणून आणल्यासारखें वाटतें तें.

श्लुमबर्जे ( Schlumberger ) त्याला माझ्याकडे घेऊन आला. मला धक्काच बसला. खुद्द आंद्रे जिद होता तो !

औपचारिकपणें आम्ही एकमेकांशीं चार शब्द बोललो. जिद खूपच गोंधळून गेल्यासारखा दिसला; आणि त्यामुळें माझाहि बुजरेपणा जास्तीच वाढला. श्लुमबर्जे निघून गेला कांहीं वेळानें. त्यानंतर जिद कांहीं वेळ तिथेंच घुटमळला, मग आपला कोट उचलून घेतला, आणि एकदम माझ्याकडे मोहरा फिरविला.— पुन: एकदां बावचळल्यासारखा थांबला, मग चोरट्या नजरेनें एकदां आवतीभोंवतीं बघितलें, आणि एखादा नवशिका नट ज्याप्रमाणें उगीचच उसनें अवसान आणून "बघा याचा कसा समाचार घेतो आतां" अशा मुद्रेनें प्रेक्षकांसमोरून दुसऱ्या नटाला बकोटीला मारतो, त्याप्रमाणें मला पकडून मागील बाजूस एक रिकामी खोली होती तिथें घेऊन गेला. खोलींत सगळीकडे खूपसा कागदाचा ढिगारा सांचला होता. ह्या स्वारीनें सरळ लायब्ररीच्या पायऱ्यांवर आसन ठोकलें. माझ्याकडे बघितलेंहि नाहीं; स्वतःचें आसन ठीकठाक करीत, घाई गडबडीनें माझ्याबद्दल कौतुकाचे दोन शब्द पुटपुटला. पण म्हणून, माझें पुस्तक त्याला फार आवडलें, असें मला सांगितलें म्हणतां ? छे, उलट म्हणाला कीं गेल्या उन्हाळयांत प्रवासांत बरोबर माझें तें प्रचंड लिखाण घेऊन जाणें त्याला भाग पडलें. पहिल्याप्रथम तर फार रटाळच वाटलें. पुढें पुढें मात्र कुतूहल जागें झालें. आणि लेखकाला एकदां भेटावेसेंहि वाटूं लागलें. त्यांत पुनः नुकती मी तिशी ओलांडली आहे हें समजल्यावर तर आश्चर्यच वाटलें... येवढा वेळ, मी जवळजवळ गप्पच होतो म्हणानांत... इतक्यांत एकदम त्यानें वर बघितलें, गुडघ्यावर कोंपर रोवून, हातांच्या तळव्यावर हनुवटी टेंकविली, माझ्याकडे बघितलें आणि एकदम दिलखुलास बोलणें सुरू केलें.

त्याच्या आवाजाची जातच कांहीं न्यारी आहे. धीरगंभीर पण मुलायम असा तो आवाज कमालीच्या सहजतेनें लहरत आल्यासारखा वाटतो. हळूंच, विश्वासांत घेऊन एखादें गुपीत कानांत कुजबुजल्यासारखा तो भासतो. त्यांतलें मार्दव, आवाजाचे चढउतार, मोठे सुखावह वाटतात. एखादें नावीन्यपूर्ण विशेषण, अगर अभिनव अर्थवाही शब्दयोजना परिणामकारकतेनें ऐकविण्यासाठीं, त्यांतील वैशिष्टयाचा पुरा प्रत्यय येण्याकरितां आवाजांत योग्य तो बदल करीत दिमाखांत एखादी तान उधळल्यासारखा तो शब्दसमूह भिरकावितो. बोलणें तर दूरच, पण अशावेळीं इतर कसला विचारहि मनांत येणें शक्य नसतें. प्रतिभेच्या या उन्मेषांत तो व्यक्त करीत असलेले विचार आणि त्यांना दिला जाणारा आकार इतके नावीन्यपूर्ण असतात कीं त्यामुळें क्षणभर दिपून गेल्यासारखें वाटतें. यापूर्वी, केवळ गप्पागोष्टींतून प्रतिभेचा असा आविष्कार झाल्याचा मला अनुभव नाहीं. यांत जरी योडीशीहि कृत्रिमतेची झांक असती, तरी ही बुद्धीची चमक मला असह्य झाली असती. पण जिदच्या सगळया बोलण्यांत अशी एक सहजता आहे, कीं आपल्या नकळत, तो








केव्हांच आपल्या मनाचा कब्जा घेतो. या अशा-वेळीं, त्याच्या व्यक्तिमत्त्वाचें कांहीं आगळेंच दर्शन घडतें. कांहीं वेळापूर्वी जेव्हां तो आंत शिरला, तेव्हां मला तो दिसला होता इतकेंच. पण मी त्याला नीटसें न्याहाळून बघितलें नव्हतें. आतां तो एकदम किती निराळा भासत आहे ! त्याचे वाढलेल्या दाढीचे खुंट, विस्कटलेले केंस, चुरगळलेली कॉलर,– हें सारें आतां माझ्या नजरेआड झालें आहे. त्याच्या मुद्रेवरचा उदात्त भाव, डोळयांतून प्रतीत होणारी बुद्धिमत्ता आणि जिव्हाळा, हास्याची सूक्ष्मशी छटा, नादमधुर आवाज, आणि मला भारून टाकणारा त्याच्या स्वभावाचा गोडवा,– या सगळयाची एक नवी जाणीव आतां मला होत आहे. माझ्यावर त्याची नजर आतां खिळून राहिली आहे. उघडपणें माझ्याकडून साद मिळण्याची त्याची अपेक्षा आहे. त्याच्या विचारांना मी होकार भरावा, वाद-संवाद घडून यावा, आणि एक सुहृद लाभावा, ही त्याची इच्छा त्याच्या नजरेंतून ओसंडत आहे... मी अगदीं गडबडून गेलों. थोडासा धीर चेपला, आणि उत्तर द्यावयाचा प्रयत्न केला. त्याचें 'नुरीत्यूर तेरेस्त्र' ( Nourriture Terrestre ) हातांत पडलें, तो अविस्मरणीय दिवस त्याला वर्णन करून सांगावेसें वाटूं लागलें. ... आणि तेवढ्यांत, एकदम जिद उठून उभा राहिला. कांहीं सूचना नाहीं, आवाजांत कसला बदल नाहीं, तोंडांतलें वाक्य पुरें करण्याइतपतसुद्धां सवड नाहीं, तडतडीत, गडबडयां, आणि तरीहि मोठा आकर्षक दिसतो तो. डोक्यावर हॅट ठेवली, खांद्यावर क्लोक अडकविला, आणि एकदम समोरून नाहींसा झाला. कोणाशी हस्तांदोलन देखील नाहीं, – अगदीं माझ्याशींसुद्धां !

कोणी सांगावें, 'ज्यां बॉर्वा'चा लेखक कसा काय दिसतो, हें बघण्याकरतांच स्वारी आली होती कीं काय, कोण जाणें !

## जिदचीं स्मृतिचित्रें व आत्मविश्वास

फेब्रुआरी १९२०

जिदच्या बोलण्यांत सध्यां तो लिहीत असलेल्या त्याच्या 'स्मृतिचित्रां' (Memoirs) खेरीज दुसरा विषय नाहीं.

" माझ्या जाणिवेच्या कक्षा आतां कुठें जरा उजळायला लागल्या आहेत. पण इतक्यांतच अनेक प्रश्न मला अस्वस्थ करूं लागले आहेत. रोजे, दोस्ता, मोठा विक्षिप्त विचार आहे. पण मला वाटतें माझ्या या आत्मकथनामध्यें जर 'सैताना'चा समावेश मला करवितां आला, तर माझे कितीतरी प्रश्न चुटकीसरसे सुटतील. कित्येक वेळां अशा-रीतीनें गोष्टी घडत गेल्या आहेत, कीं त्यामुळें सैतानाच्या अस्तित्वावर नुसता विश्वास ठेवावासा वाटतो इतकेंच नव्हे तर घटकोघटकीं त्याचा प्रभाव जाणवल्यासारखा भासतो. "

कोणत्याहि प्रसंगांतील त्याच्या वागणुकीचें समर्थन करतांना त्यामागील प्रेरणांचें विश्लेषण करण्याची त्याची एक सवय आहे. त्यांत आपण केलें तेंच बरोबर होतें असें भासविण्याचा उद्देश नसतो. त्याचें म्हणणें वेगळेंच असतें. " मी जसा आहे, तसाच असण्याचा मला हक्क आहे, आणि ज्याअर्थी मी असा आहे त्याअर्थी माझ्या वागणुकींत बदल होणें शक्य नाहीं, " ही त्याची भूमिका.

आपल्या या स्मरणसांखळींतला प्रत्येक नि प्रत्येक दुवा अगदीं पूर्ण सत्य असला पाहिजे हा त्याचा अट्टाहास आहे. "जर विश्वासाला मी पात्र ठरावयाला हवा असेन, तर मला असें म्हणतां आलें पाहिजे कीं, 'यांत कोठेंहि फसवणूक नाहीं.' प्रत्येक बारिकसारिक प्रसंग सत्याच्या कसोटीवर पारखून घेतला आहे. कदाचित कोणाचा विश्वास बसणार नाहीं, पण खरोखरीच हें सगळें घडलें आहे तें असेंच आहे आणि त्यांतला मीहि अगदीं असाच आहे. "








### माझ्या बोलण्यावरून 'इडिपस' बद्दल जिदला सुचलेली कल्पना

मार्च १९२०

आज जेवावयाला जिद माझ्याकडे आहे.

बोलतां बोलतां मी त्याला म्हटलें कीं युद्ध चालूं होतें तेव्हां मी स्वत:शींच एक कल्पनाचित्र रंगवीत असे. बॉबच्या स्फोटांत मी आंधळा झालों आहे. स्वतःशीं अखंड मनन करीत बसण्यापलिकडे इतर मला कांहींहि शक्य नाहीं. मन एकाग्र होऊन त्या समाधींत एकामागून एक अमोल ग्रंथ मी सांगत आहे आणि माझी पत्नी लिहून घेत आहे... माझ्या या बोलण्यांत तसें कांहींच विशेष नाहीं. पण जिद मात्र मी काय म्हणत आहे तें अगदीं लक्ष देऊन ऐकत आहे.

नंतर कांहीं वेळानें याचें कारण त्यानें मला सांगितलें. "तुझ्या बोलण्यांतून, अभावितपणें, सध्यां मी लिहण्याचें योजित असलेल्या 'इडिपस'चा शेंवट कसा करावा, याची एक फार छान कल्पना तूं सुचविलीस... माझा असा विचार आहे कीं नाटकाच्या सुरुवातीला जो इडिपस दाखवायचा तो म्हणजे स्वतःच्या यशाच्या धुंदीत असलेला, कर्तृत्ववान, ज्याला कसलीहि चिंता स्पर्श करूं शकत नाहीं असा, अगदीं 'गटे'नें निर्माण केला असता असा इडिपस. आणि नंतर, पुढें तसा परिस्थितींत प्रत्यक्ष असा कांहींहि बदल घडत नाहीं, पण केवळ एका भिक्षूच्या – क्रिश्चन टायरिसिअस् – प्रवेशामुळें, हा बेहोष इडिपस आपल्या सुखसर्वस्वावर पाणी सोडतो. सुरेख आहे कीं नाहीं, विषय म्हणून? तुला समजलें ना, मला काय म्हणावयाचें आहे तें? त्याच्या भोंवतालच्या परिस्थितींत कांहीं म्हणजे कांहींच बदल झालेला नाहीं. (मी मनांत म्हटलें, 'छे, कांऽहीं बदल झालेला नाहीं. फक्त त्याला एवढें कळलें आहे, कीं ज्याचा वध केला तो त्याचा पिता होता, आणि नंतर त्यानें जिच्याशीं विवाह केला, ती त्याची आई!... पण म्हणजे तसा विशेष कांहीं म्हणण्यासारखा फरक पडलेला नाहीं परिस्थितींत, नाहीं कां?) – परंतु इतके दिवस त्याचा आत्मविश्वास, सम्राटपदाचा त्याचा अभिमान, –थोडक्यांत म्हणजे आयुष्यांतला सगळा आनंद, सगळा तोलच ज्या पायावर सांवरला होता, तोच भुसभुशीत असल्याची त्याला एकदम जाणीव झाली आहे. आणि हें केवळ त्या भिक्षूनें दिलेल्या नव्या दृष्टीमुळें, –थोडक्यांत म्हणजे असंस्कृत दृष्टिकोनाची जागा ख्रिश्चन दृष्टिकोनानें घेतल्यामुळें! ... आणि आतां मला बरोबर कल्पना आली कीं माझ्या या नाटकाचा शेंवट कसा करतां येईल मला. –त्या दुर्दैवी सम्राटाला आतां फक्त एक आंस उरली आहे. केवळ एकच,–कीं या उध्वस्त झालेल्या वर्तमानांतून उठून, अंधत्वाच्या मदतीनें निबिड अंधारांत स्वतःला गुरफटून घ्यावें आणि त्यांत दिसूं शकणाऱ्या गतकालांतील स्मृतिस्वप्नांच्या सांनिध्यांत दिवस काढावे. मिळाली तर त्यानेंच शांति मिळेल, आणि पुनः एकदां जीवनाबद्दलची ओढ निर्माण होईल."

### जिदचें विचित्र घर!

ऑक्टोबर १९२०

आज सकाळीं 'व्हिला मॉंमोरॉंसि' मध्यें जिदला भेटावयाचें ठरलें होतें. तो मला त्याच्या 'सि ल ग्रँ...' (si le grain) चा कांहीं भाग वाचून दाखविणार होता.

घराचा दरवाजा उघडाच आहे. मी त्याला हांक मारली. आणि कोठून तरी खोलांतून, खूप लांबून असा त्याचा आवाज ऐकूं आला. घरांतलीं सगळींच दारें सताड उघडीं आहेत. तो धांवतच बाहेर आला. हातामध्यें लिखाणाचे कागद आहेत. मला असें वाटतें कीं बहुधा माझी वाट पहात, एकटाच या निर्मनुष्य घरांत एका खोलींतून दुसरींत तो हिंडत होता. किती विचित्र घर आहे तें! कथाकादंबऱ्यांत








वर्णन करतात तसल्या या चमत्कारिक घरांत, त्यालाच काय, कोणालाच फारसा मोकळेपणा वाटणार नाहीं. तो तर या घराशीं एकजीव झाल्यासारखा वाटतच नाहीं.

त्याला इतकी घाई झाली आहे, कीं तिथल्या त्या वळणावळणाच्या जिन्यावरून त्यानें मला ढकलितच नेलें. 'एडगर ॲलन पो' च्या रहस्यमय कादंबऱ्यांत शोभून दिसेल अशी फार विचित्र बांधणी आहे त्या जिन्याची. एखाद्या भव्य पण रिकाम्या पिंजऱ्यांत आंतल्या जाळीला अडकविलेल्या शिडीसारखा दिसतो तो. त्याचे कांही भाग तर असे चक्रव्यूहांतल्यासारखे दिसतात कीं बहुधा माणसांना गोंधळून टाकण्याकरितांच ते बांधले असावेत असें वाटतें. त्या पायऱ्या पुढें कुठे निघतात, कोण जाणें ! पहिल्या माळयावर पोहोंचल्यावर मी जिदच्या मागें एका कॉरिडॉरमधून पुढें निघालों. बाजूला एका सताड उघडया दरवाज्यामागें बोटींतल्या केबिनची आठवण करून देणारी एक खोली होती. आंत आंथरूण तसेंच पसरलेलें होतें. आणखी वर गेलो. पुनः एक कॉरिडॉर लागला, वाटेंत खूपशा ट्रंका पसरल्या होत्या, आणि त्यामुळें रस्ता जवळजवळ बंदच झाला होता. पुढें एक लंगडें, मोडकळीस आलेलें टेबल भेटलें. बिचारें वर रचलेल्या कागदाच्या ओझ्याखालीं पार दडपून गेलें होतें. एका मोठया शेगडीपाशीं एक घडवंची उभी होती. "मी तेथें बसतो नेहमी काम करतांना. पण तुला या इकडेच बरें वाटेल," असें म्हणून जिदनें मला पुढें ढकललें. आणखी जिने. सरतेशेवटीं आम्ही एका छोटयाश्या गॅलरीसारख्या दिसणाऱ्या खोलींत शिरलों. इथें सगळीकडे खिडक्याच खिडक्या होत्या. पलीकडे एक अंधारी खोली होती. आंत जिकडेतिकडे टेबलें, कपाटें, खुर्च्या आणि पुस्तकांचे ढीगच्या ढीग होते. त्यांतील बरीचशीं पुस्तकें खालीं जमिनीवर कोसळलीं होतीं. सामानानें भरलेल्या या खोलींत दोन भक्कम काळया लाकडी खुर्च्या आमची प्रतीक्षा करीत होत्या.

खिडकींत रेटून बसविलेलें एक टेबल आहे. त्याच्यावर आपली वही उघडून, खुर्चीवर जिद येऊन बसलाहि. खिडकींतून पलीकडे घरांचीं छपरें दिसत आहेत, आणि एक देवदार वृक्षाचा शेंडाहि दिसतो आहे. आंत येणाऱ्या प्रकाशांत, आनंदानें उजळून निघालेला जिदचा चेहरा मोठा आकर्षक दिसत आहे. त्याच्या डोळयांवर चष्मा आहे. (वाचूं लागला, कीं तो नाकाच्या चामखिळाच्या खालीं घसरतो. आणि वर माझ्याकडे बघितलें कीं चष्माहि वर सरकतो.) उगीच नमनावर घडाभर तेल न ओततां, अगदीं वखवखल्यासारखी त्यानें एकदम वाचायलाच सुरुवात केली. तो वाचीत आहे त्या मजकुरानें त्याचें मन चांगलेंच भारावून गेलें आहे. भावनावेगानें हात आणि ओंठ थरथरत आहेत.

## अभिजात कलेचा जन्म अभावितपणें

जुलै १९२०

आज जिद खूप वेळ बसला होता. १९१३ मध्यें माझी ओळख होण्यापूर्वी, माझ्याबद्दल त्यानें काय उद्गार काढले होते, त्याची मी त्याला आठवण दिली. 'नुव्हेल रव्हयू फ्रांसेज'ला, माझ्या 'ज्यां बार्वा' प्रकाशित करण्याचा सल्ला देतांना, तो म्हणाला होता, " तसा तो कलावंत नसेल, पण एकूण फार सज्जन माणूस आहे."

या आठवणीवर हंसत हंसत, तो मला म्हणाला, "आपण कलावंत नाहीं, म्हणून कांहीं इतकें वाईट वाटून घेऊं नकोस. आम्ही इतर सगळेजण जरा जादाच कलावंत आहोंत. शार्ल लुइ फिलिपसारखी तुझी गत होऊं देऊं नकोस. मी त्याला फार जवळून बघितलें आहे. मोठी दुर्दैवी घटना आहे ती. त्याच्या हातांत खरीखुरी निर्मात्याची किमया होती. आमच्या सहवासानें त्याचा विचका झाला. अधिकाधिक





अनुक्रमणिका

कलाकार होण्याच्या नादांत त्यानें स्वत:ची विलक्षण ओढाताण केली. निष्कारण स्वत:ला जखडून घेतलें, आणि शेवटीं स्वत:च्या व्यक्तित्वाचा कोंडमारा करून टाकला...... एक नेहमीं ध्यानांत ठेव, कोणताच खराखुरा कलावंत, एखादा कलाविचार मनाशीं घट्ट पकडून मग निर्मितीस सुरवात करीत नाहीं. कलावंताची इच्छा असो वा नसो, अभावितपणें तो कलाकृतीला आकारास आणीत जातो आणि म्हणूनच त्याची कलाकृति वैशिष्ट्यपूर्ण तऱ्हेनें त्याची ठरते. त्यांत तर तिचें नावीन्य सांठवलेलें असतें. "

नंतर आमच्या बोलण्याचा ओघ, कादंबरी, कादंबरीकार आणि त्याची निरीक्षणशक्ति, या विषयाकडे वळला. या संदर्भांत, जिद म्हणाला, "मला हें कबूल केलें पाहिजे कीं अलीकडे जरा डोळे उघडून आयुष्याकडे आणि इतर व्यक्तींकडे मी नजर फिरवूं लागलों आहे. तसेंच म्हणायचें म्हणजे, वयाच्या चाळिसाव्या वर्षापर्यंत, माझ्या भोंवतीं काय घडत आहे इकडे लक्ष देण्याची मी कधीं पर्वाच केली नाहीं. धार्मिक आणि लैंगिक अशा दोन प्रकारच्या समस्यांच्या विचारांत मी पूर्णपणें गुंतलों होतो. ते प्रश्न कधीं सुटूं शकतील, असें मला वाटत नव्हतें. पण त्याचबरोबर इतर कशाकडे लक्ष पुरविण्याइतपत महत्त्वाचें मला कांहींच आढळत नव्हतें. आंधळ्यासारखी माझी गत झाली होती.

### दोन मनें

— १९२०

मी त्याला म्हटलें, "जर कोणी मला एखाद्या निर्जन बेटांत पाठविलें, आणि बरोबर नेण्याकरितां तुझ्या कुठल्याहि एका पुस्तकाची निवड करण्यास सांगितलें, तर मी तुझें 'सोल' (Saul)च पसंत करीन."

त्याला फार आश्चर्य वाटलें. हंसून तो म्हणाला "तुला माहित आहे, 'थेआत्र आंत्वान'मध्यें प्रयोग होण्यापर्यंत त्या नाटकाची मजल गेली होती. तें नाटक बसवायची त्या नाट्यगृहाच्या मालकाला फार इच्छा होती. मला तो म्हणालाहि एकदां,— म्हणजे तीच त्याची आणि माझी पहिली नि शेवटची भेट,— "जिदसाहेब, तुमचें 'सोल' फार सुरेख नाटक आहे. जर माझ्या पुढल्या नाटकाचा प्रयोग यशस्वी झाला, तर माझ्या हातांत पुरेसे पैसे येतील, आणि मग लगेच तुमच्या नाटकाच्या तालमीच सुरूं करतो मी." तो म्हणत होता, तें नाटक होतें ब्रियचें, (Brieux) 'रेझुलता दे कूर्स' (Re'sultat des Courses). त्याच्या पहिल्या प्रयोगाला मी कमालीच्या उत्कंठेनें हजर राहिलों. तें नाटक यशस्वी व्हावें याची मला इतकी तीव्र इच्छा होती, कीं प्रथमप्रथम मी स्वत:ला समजाविण्याचा प्रयत्न केला कीं, 'छान वठतें आहे हें नाटक.' पण दुसऱ्या अंकानंतर मात्र सत्य गोष्ट नजरेआड करणें मला अशक्य झालें. महाभयंकर होतें तें नाटक. छे,— पार पडलें अगदीं. आमचें भवितव्य आम्हाला समजलें. तिसऱ्या अंकाच्या आधींच मी बाहेर आलों. आणि अशारीतीनें ब्रियच्या 'रेझुलता'नें माझ्या 'सोल'चा बळी घेतला!"

... बोलतां बोलतां मी त्याच्या नजरेला आणून दिलें, कीं आतां त्यानें अगदीं परस्परविरोधी विधानें केलीं. त्यावर हंसत मला तो म्हणाला, "स्तांधालचें (Stendhal) वाक्य आठवतें कां तुला? "मला दोन मनें आहेत. — चुका टाळण्याचा फार छान मार्ग..." त्याचें हें बोलणें थट्टेवारीच न्यायचें ना?

### जिदचें अनुकरण करण्यांत फसगत

डिसेंबर १९२०

कांहीं वेळेला कशी मजेदार गैरसमजूत होते, बघण्यासारखें आहे. मी नुकताच जिदकडे जायला लागलों होतो तेव्हांची गोष्ट. 'ओतय'(Auteuil)च्या












त्याच्या बंगल्यांत मी गेलों होतो तेव्हां माझ्या-शेजारच्या टेबलावर, अगदीं पुढेंच एक जाडजूड आणि जीर्ण झालेला ग्रंथ मी बघितला. मला जरा विशेष कुतूहल वाटलें म्हणून जवळ जाऊन नांव बघितलें तो 'ब्वासिए'ची (Boissiere) 'दिक्सि-ऑनेर आनालोजिक'. 'अरेच्या, असें आहे कां?' मी स्वतःशीं म्हटलें. "जिदच्या भाषाप्रभुत्वाचें आणि मनोवेधक शब्दरचनेचें रहस्य हें आहे होय ? मग आपणहि ब्वासिएचा एक शब्दकोश आणलाच पाहिजे." खूप शोध केला, पण तो कोश इतका जुना झाला होता कीं आतां त्याची प्रत मिळणें अशक्यच होतें. माझ्या ओळखीच्या ग्रंथविक्रेत्यांना मी शोधांत रहावयाला सांगितलें. आणि शेवटीं एकदांची त्यांनी कुठून तरी एक प्रत मिळविली. विस्कळित, फाट-लेली अशी प्रत होती ती. आणि किंमतहि भरपूर द्यावी लागली मला. यत्किंचित खळखळ न करतां मी पैसे देऊन टाकले, आणि तिचा भरपूर उपयोग करण्याच्या नादाला लागलों.

पुढें क्लेरमॉला आल्यावेळीं जिद एकदां माझीं पुस्तकें चाळीत होता. "अरेच्या, ब्वासिएचें हें चोपडें तुझ्याहिजवळ आहे वाटतें ? काय उपयोग करतोस त्याचा ?" जिदनें विचारलें.

"वा, – उत्कृष्ट आहे तो कोश."

"खरं ! मी एकदां घेतला होता एक विकत. पण कधीं विशेष उघडायचीहि वेळ आली नाहीं मला. या असल्या गोष्टी कधींच उपयोगाला येत नाहींत माझ्या."

## डोस्टोवस्कीचे धक्के व कादंबरीशैलीचे दोन पंथ

गेले तीन दिवस आम्ही दोघेंच एकत्र रहात आहोंत. एकमेकांना वाचून दाखवावें, आणि गप्पांना तर खंडच नाहीं. माझ्या लिखाणासंबंधीं मला सूचना करतांना जिद अनुसरतो ती पद्धत मोठी वैशिष्ट्यपूर्ण आहे. तो स्वतः माझ्या जागीं आहे अशी कल्पना करतो. या सूचना करण्यामागे माझें स्वतंत्र व्यक्तिमत्त्व जास्तींत जास्त जागें व्हावें, हा हेतु असतो. पाहिजे तसा उठाव न मिळालेलें एखादें पान उचलतांना, "मी असतों तर असें लिहिलें असतें" असें म्हणण्याऐवजीं, तो म्हणेल, "जर तुझी खरी तार लागली असती, तर तूं स्वतःच हें असें लिहिलें असतेंस."...

त्याच्या डोक्यांत घोळत असलेल्या एका कादंबरी-चें कथानक त्यानें मला ऐकविलें. त्याच्या या बोलण्यां-तून, आम्हां दोघांच्या कादंबरी-लेखनासंबंधींच्या दृष्टिकोनांत केवढा फरक,—नव्हे विरोध, आहे याची जाणीव मला झाली. माझ्याबद्दल बोलायचें तर मला कबूल केलें पाहिजे कीं माझे विचार अजून फार अपरिपक्व आहेत. वस्तुनिष्ठ दृष्टि, सत्यासंबंधीचा अभिनिवेश, रचनेंतील सुगमपणा, इत्यादि जें कांहीं मी बोलतों त्याबद्दलच्या कल्पना अजून माझ्या मलाच तितक्या स्पष्ट झालेल्या नाहींत.

आपलें म्हणणें शक्य तितकें स्पष्ट करण्याकरितां, जिदनें एका कोऱ्या कागदावर एक सरळ आडवी रेघ मारली. आणि मग माझा टॉर्च घेऊन, प्रकाश-वर्तुळानें, एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत ती रेषा उजळीत गेला. "तुझ्या 'बार्वा' आणि 'थिबो' (Thibault) या अशा आहेत. तुझ्या कादंबरीतील प्रमुख व्यक्तीचा आयुष्य-प्रवाह, अगर एखाद्या कुटुंबांतील माणसांच्या नशिबाचे चढउतार, यांचें तूं मनांत एक चित्र रंगवतोस आणि मग ओळीनें एका वर्षामागून दुसरें वर्ष याप्रमाणें त्या जीवनांतील सर्व काल तूं उजळीत जातोस, पण तेंच माझें बघ. मी माझें 'फो मोनोय्यर्' (Faux-Monnayeurs) हें असें रचलें." हातांतला कागद त्यानें उलटला. मागल्या बाजूस एक मोठें अर्धवर्तुळ रेखाटलें. त्याच्या मध्यावर आपला टॉर्च ठेवला. आणि मग तो अशा रीतीनें फिरविला कीं त्याचा प्रकाश तर








अर्धवर्तुळाच्या रेषेवरून पुढें सरकला पण टॉर्चनें मात्र पानाच्या मध्यावरची आपली जागा सोडली नाहीं. " रोजे, समजलें ना तुला ? कलाक्षेत्रांतील या दोन पद्धती आहेत. तूं, एखाद्या इतिहास-लेखकाप्रमाणें घटनांची कालानुक्रमानुसार मांडणी करतोस. तुझी कादंबरी म्हणजे एखादा चित्रपट उलगडल्यासारखें वाटतें. वर्तमानांतून भूतकाळाकडे तूं बघत नाहींस. गतकाळांतील घटनांचें वर्णन करतांना, त्यांत प्रत्यक्ष भाग न घेतलेल्या व्यक्तीच्या तोंडून तूं त्यांचें चित्रण करीत नाहींस. उलटसुलट बाजूंनी पाहिल्यास गोष्टी कशा दिसतात, अगर आधुनिक दृष्टिकोनांतून मागील घटनांचें निरीक्षण केल्यास कशी नावीन्यपूर्ण मांडणी करतां येईल, याचा तूं विचार करीत नाहींस. तुझ्या कादंबऱ्या सरळ, धोपटमार्गी, रूढ चाकोरींतून लिहिल्यासारख्या वाटतात. आणि त्यामुळें कादंबरीलेखनाला अत्यंत आवश्यक असणाऱ्या कांहीं बहुमोल गुणांना तूं मुकतोस. रेम्ब्रँड्टचेंच उदाहरण घे. अनपेक्षित प्रमाणांत, चित्राचे वेगवेगळे भाग, कमीजास्त प्रकाशित करून तो त्यांत केवढा अर्थ भरूं शकतो याचा तूं कधीं विचार केला आहेस काय ? प्रकाश-योजना हें एक मोठें गहन शास्त्र आहे. त्यांत सामावलेल्या अनंतविध वैशिष्ट्यांचा योग्य उपयोग करणें, हीच एक स्वतंत्र कला आहे."

" कला ? कां निव्वळ कारागिरी ? " मी विचारलें. " तूं कांहींहि म्हण त्याला. तुझ्या प्रकृति-नुसार तूं लिहितोस. तुझा पंथ म्हणजे टॉलस्टॉयचा पंथ. मी डोस्टोव्हस्कीच्या गटांत जमा होतो, —निदान मला व्हावेसें वाटतें. एक मात्र लक्षांत ठेव हं. टॉलस्टॉयबद्दल मला कमालीचा आदर आहे. निरीक्षक म्हणून त्याचा हात कोणी धरूं शकणार नाहीं. पण केवळ तेवढें मला पुरेसें वाटत नाहीं. त्यानें निवडलेल्या व्यक्तिरेखांचा अभ्यास करतांना, तो त्यांच्या स्वभावांतील सर्वसामान्य मानवी वैशिष्ट्यांवर भर देतो. आपल्या प्रत्येकांत नेहमीं सांपडणारीं अशींच तीं वैशिष्ट्यें असतात. थोडक्यांत म्हणजे मला जें आधींच माहीत असतें, तेंच तो पुनः उलगडून दाखवीत असतो. थोड्याफार प्रयत्नांनीं माझ मलाच तें हस्तगत करतां आलें असतें. विस्मय वाटेल, अचंबा वाटेल, अशी अगदीं अनपेक्षित बाजू तो दाखवूं शकत नाहीं. तेंच, डोस्टोव्हस्की मात्र मला सतत आश्चर्याचे धक्के देतो. एकसारखा तो कांहीं तरी नवीन, अनपेक्षित, मी पूर्वीं कधीं न पाहिलेलें, असें माझ्या अपेक्षेबाहेरचें कांहींतरी माझ्यापुढें करतो."

कांहीं वेळ थांबून तो पुढें म्हणाला, "जातां जातां आठवलें म्हणून सांगतो,—इब्सेनच घे कीं ! त्याच्या व्यक्तिरेखा टॉलस्टॉय इतक्याच हुबेहुब भासतात, आणि तरीहि डोस्टोव्हस्कीप्रमाणें फार वैशिष्ट्यपूर्ण, विस्मयजनकहि असतात."

**समसंभोग व कमालीच्या तीव्र**
**कामवासनेचा वारसा**

एप्रिल १९२१

आज जिद आला तेव्हां दुपार उलटून गेली होती. जेवावयाला माझ्याचकडे होता तो.

एखादा दिवसच असा असतो, कीं तो येतो त्या क्षणापासूनच विचारानें भारावल्यासारखा दिसतो. त्याच्या गंभीर पण प्रसन्न, बोलक्या मुद्रेवरून माझ्या लक्षांत येतें कीं, आजच्या संभाषणाला गति त्याच्या-कडून मिळणार आहे. अशा वेळीं त्याच्या ओघांत वहात जाणेंच फक्त मला शक्य असतें. त्याच्या मनांत त्या दिवशीं घोळत असलेल्या विषयाला हात घालण्याचे आधीं, तो निदान पंचवीस प्रश्नांवर बोलणें करील. कारण त्या दिवसाचा असा एक विषय निश्चित असतो. कुठलेंहि बोलणें काढा तो पुनः तिकडे वळणार. तो त्याला एकसारखा बेचैन करीत असतो. त्याच्या भोंवतीं बराच वेळ तो रिंगण घालील. जणूं कांहीं स्वतःशींच लपंडाव खेळतोय. मध्येंच गूढार्थ-सूचक मानेची हालचाल करील. पण

शेवटीं एकदां त्याच्यावर तुटून पडेल. एखादे वेळीं हा क्षण अगदीं शेवटीं, दाराच्या कडीला हात घालतांना, येईल. पण मग तो परत फिरेल. खाली बैठक मारेल, आणि इतका वेळ त्याच्या मनांत असलेला तो विचार बोलून दाखवील. तेंच या भेटीचें प्रयोजन असतें.

आजच्यासारख्या संध्याकाळच्या वातावरणाचें वर्णन करणें अशक्य आहे. अनपेक्षित कलाटणी घेत पुढें सरकणारें आमचें संभाषण, त्यांत व्यक्त होणारे विचार, या सर्वांची नोंद करतां येणार नाहीं. आजच्या गप्पांत आनुवंशिकतेसंबंधी विषय निघाला, त्याबद्दलचे त्याचे विचार फक्त नमूद करतो. तो मला म्हणाला, " आमच्या सबंध घराण्यांत समसंभोगी वृत्तीचा मी पहिलाच आहे. मी असें म्हणतों त्याला भरपूर पुरावाहि आहे. माझ्या पूर्वजांपैकीं प्रत्येकजण, कडक, सोवळया वृत्तीचा, नीतिनियमांच्या बंधनांनी स्वतःला जखडून घेतलेला, अगदीं अस्सल प्रॉटेस्टंटपंथीय असाच होता. त्यांच्यांपैकीं कोणाच्या मनांत कधीं मोह निर्माण झालाच असला, तरी त्याच्याशीं झगडून तो दाबून टाकण्याचाच त्यांनीं कसोशीनें प्रयत्न केला. आणि या सगळया आत्मसंयमनाचा बळी मी आहे. आपल्या नैसर्गिक वासना माणसें किती पिढ्या दडपूं शकतील ? त्याचें फळ केव्हांतरी भोगावें लागतेंच. शेवटीं एक क्षण असा येतोच कीं निसर्ग त्यांच्यावर विजय मिळवितो. मी असेंच म्हणेन कीं त्यांच्या कठोर संयमनाचा बदला निसर्ग माझ्यातर्फे घेत आहे. मला एक मात्र खात्री आहे कीं माझी ही विशिष्ट आवड पुढल्या पिढींत उतरणार नाहीं. तें माझें स्वतःचें संचित आहे, त्याचा वारसा पुढें चालणार नाहीं. शिक्षण व परिस्थिति यांची माझ्या सहजप्रवृत्तींशीं जी रस्सीखेंच झाली त्यांतून मी आतां आहे तसा बनलों. रूढिप्रिय, धर्मप्रवण अशा व्यक्तींनी पिढ्यानुपिढ्या कठोरपणें दाबून टाकून कह्यांत राखलेल्या, पण आंतून कमालीच्या तीव्र असलेल्या कामवासनेचा वारसा मला मिळाला आहे. आणि त्यामुळेंच, इतकीं वर्षें दबली गेलेली ही वासना माझ्या मनांत दुप्पट जोरानें उसळी मारीत आहे. "

## स्वतः च्या अवहेलनेची तहान

मार्च १९२२

जिदच्या मतें आपलीं 'सिलग्रॅं न मर' (Sile grain ne meurt) व 'कॉरिदॉं' (corydon) त्यानें आतां प्रकाशित केलींच पाहिजेत. आणखी थांबणें आतां त्याला शक्य नाहीं. त्याच्या या बेतापासून त्याला परावृत्त करण्याचा शक्य तेवढा प्रयत्न मी केला. मी त्याला म्हटलें, " तुझ्या या करण्यानें निष्कारण जें काहूर तूं उठविशील—आणि तें उठणार, हें नक्कीच—तें पूर्ण निरर्थक आहे अशी थोडी जरी माझी खात्री पटली असती, तरी मी तुला थांबविलें नसतें. आधींच तुला, थोडे शत्रू नाहींत. त्यांच्या हातांत तूं हें नवीन कोलीत देत आहेस. याशिवाय, तुझ्या स्नेह्यांपैकीं निम्म्याहून जास्त मित्र तूं गमावशील यामुळें. तुझ्या खाजगी जीवनावरील पडदा बाजूला न केल्यानें, व बाह्य देखावा तसाच चालूं ठेवल्या कारणानें, तुझें चारित्र्य निर्मळ आहे अशी जोपर्यंत त्यांची समजूत कायम आहे, तोंपर्यंतच तुझ्या खाजगी जीवनाबद्दलचीं तुझीं वक्तव्यें ते मान्य करतील. खाजगी झालें, तरी तेंहि जीवन संयमपूर्ण असलें पाहिजे. पण ज्या दिवशीं तुझ्या सगळया सवयींची, अलिप्त वृत्तीनें कां होईना पण जाहीर कबूली तूं देशील, त्या वेळीं त्यांना तुझ्याबद्दलची आपली भूमिका निश्चित करणें भाग पडेल, आणि अशा वेळीं मग ते तुझ्याविरुद्धच बोलतील, हें निःसंशय ! खरं म्हणजे तूं हें करीत आहेस तो निव्वळ पागलपणा आहे. तिरस्कार, संताप, कुचेष्टा यांनीं भरलेलें वातावरण तूं स्वतः भोंवतीं निर्माण करून घेत आहेस. आणि तूं कसा







आहेस तें मी नीट ओळखतों. परिणामीं यामुळें तुझ्या मनाला फार क्लेश होतील, आणि या विचारानेंच मला दु:ख होतें. तुझ्या विकासाला हें बाधक ठरेल, यांत शंका नाहीं. ”

माझें हें बोलणें ऐकतांना त्याच्या मुद्रेवर माझ्याबद्दलचा जिव्हाळा दिसत होता. पण शेवटीं सर्व ऐकल्यावर, निश्चयानें त्यानें मला नकार दिला. “ छे, छे, आणखी थांबणें मला आतां शक्य नाहीं. माझी ही इच्छा इतकी प्रबळ आहे कीं मला तिच्यापुढें मान तुकविल्याशिवाय गत्यंतर नाहीं. रोजे, माझें नीट समजून घे. तरुण असल्यापासून —किंवा खरें म्हणजे अगदीं लहानपणापासून—फसवणुकीच्या या बुरख्यामागें मी वावरतों आहे. तो दूर झालाच पाहिजे. मी त्यामुळें गुदमरून जात आहे.”

त्याच्या या वृत्तीला, माझ्या मतें, त्याच्यावरील रशियाचा प्रभाव जबाबदार आहे. गेले कित्येक दिवस तो दोस्तोव्हस्कीच्या सहवासांत आहे. जाहीर कबुलीजबाब देण्याची एक साथच असते. रशियन कादंबऱ्यांतील नायकाप्रमाणें, समाजाला डिवचून त्याचा रोष अंगावर ओढून घेण्यांतच त्याला मोठेपणा वाटतो. लोकांकडून होणारी अवहेलना, हेटाळणी, धि:कार यांचीच त्याला तहान लागली आहे. आपल्याबद्दलच्या गैरसमजांमुळें, समाजाकडून केल्या जाणाऱ्या निंदेचे घाव आपण सहन करीत आहोंत, आणि हें सर्व जणूं आपल्या उदात्त, प्रामाणिक निष्ठेचें फळ आहे, असें चित्र जेव्हां त्याच्या मनापुढें येतें, तेव्हां आत्मविकासाच्या अत्युच शिखरावर पोहोंचल्याचाच त्याला आनंद होतो.

पण माझें हें बोलणें म्हणजे पालथ्या घड्यावरचें पाणी आहे. जिद दोन्हीं पुस्तकें प्रकाशित करणार यांत संशय नाहीं. लिहून पुरें केलेलें पुस्तक टेबलाच्या खणांत फार दिवस ठेवण्याइतका धीर त्याला कधींच नसतो.

### उघड्या बंब स्थितींत पॉर्केरोलचें बेट

जुलै १९२२

आज पहाटेंच तो जागा झाला, आणि मनमुराद भटकण्यासाठीं बाहेर पडला. झिंगलेल्या जंगली माणसाप्रमाणें उघड्याबंब अवस्थेंत, या बेटावर तो पिसाटपणें धांवत होता. झाडाझुडुपांचे ओरखाडे अंगावर घ्यावेत, मधमाशांचा पाठलाग करावा, फुलें खुडावींत. झुडुपांवरील रानफळें ओरबाडावींत, सर्वांत उत्रदार कोठें आहे याचा तलास लावीत प्रत्येक गुंफेंत शिरावें, एका खडकावरून दुसऱ्यावर उड्या माराव्या, अरुंद कपारींतून शंख, शिंपले, छोटे समुद्रमासे वेचक्यांत पकडून आणावेत ! हॉटेलमध्यें तो परत आला, तेव्हां बारा वाजून गेले होते. हातांतल्या रुमालांत छोटे समुद्रांतले मासे होते. कानांत रेती दिसत होती. आणि सगळ्या शरीरावर शेवाळें चढलें होतें. अशा या अवतारांत, हंसत खिदळत जिद परत आला, तेव्हां डोळ्यांत धुंदी होती आणि नखःशिखांत आनंदानें न्हाऊन निघाल्यासारखा दिसत होता.

आज संध्याकाळीं दुकानांतून एक हॅट घेऊन आला. तिचें वर्णन करणें माझ्या शक्तीबाहेरचें आहे ! आतां सारखी तीच डोक्यावर चढवून आहे. कामाला सुरुवात केली आहे. हॅम्लेटच्या पहिल्या अंकाचें भाषांतर तो करतो आहे. पण मधूनच समुद्रावर फेरफटका करण्याची त्याची लहर अनावर होते. आणि मग मनांत आलें कीं तो निघाला. पुस्तकें, वह्या, व्याकरणाचे ग्रंथ, शब्दकोश यांचे ढीग दोन्ही हातांत घेऊन पाईनच्या राईतून तो वाट चालूं लागतो. परततो, तेव्हां विचारांनीं भारून गेलेल्या अवस्थेंत असतो. पुन: लगेच लेखणी उचलून लिहावयाला सुरुवात होते ... मघाशीं जेव्हां समुद्राच्या कांठाशीं तो पाणी उडवीत बसला होता, तेव्हां कुठल्याशा इंग्लिश शब्दसमूहाला फ्रेंच प्रति-

शब्द तो आठवीत होता. आणि आश्चर्य असें कीं त्याला तें गवसलें !

## देखणीं तरुण मुलें

पॉरकोल १९२२

आज दुपारीं मी जिदला ' ला गॉफ्ल ' (Lo gonfle) चें पहिलें संस्करण वाचून दाखविलें. या वेळीं आम्ही समुद्रकिनारीं बसलो होतो.

मी वाचायला सुरुवात केली तोंच, आमच्यापासून सुमारें तीनशें यार्डांवर, दोन अतिशय देखणीं तरुण मुलें समोरून आलीं आणि किनाऱ्यावर भटकूं लागलीं. कांहीं वेळानें आंघोळ करण्यासाठीं खडकांच्या बाजूला निघून गेलीं. जिदनें लगेंच माझी दुर्बिण मागून घेतली. " मी ऐकतोय हं रोजे, वाचायचा थांबूं नकोस. चालूं दे तुझें " असें म्हणत ती दुर्बिण डोळयांना लावली. माझें वाचन जवळजवळ एक तास चालूं होतें. पण तेवढ्या वेळांत एकदांहि त्यानें दुर्बिण खालीं ठेवली नाहीं. माझें वाचनांतलें लक्ष उडालें. मी फार खट्टू झालो होतो. रागहि आला मला. असें सरळ दिसत होतें कीं याचें सारें लक्ष समोर पाण्यांत डुंबणाऱ्या त्या नग्न मुलांनी वेधून घेतलें होतें. वाऱ्याबरोबर त्यांच खिदळणें आणि आरोळया आमच्या कानावर येत होत्या. त्यावेळीं जर सैतान अवतीर्ण झाला असता आणि जिदला तिकडे जाण्याला मोकळीक मिळावी म्हणून माझें लिखाण समुद्रांत बुडवून टाकण्याची त्यानें तयारी दाखविली असती, तर त्याच्याबदली आपल्या आत्म्याचें उदक सैतानाच्या हातावर सोडावयालाहि जिद तयार झाला असता... शेवटला अंक मी वाचून संपविला मात्र, माझ्या नाटकाबद्दल एक शब्दहि न बोलतां, ' पाय मोकळे करण्यासाठीं ' म्हणून जिद उठून गेला देखील !

परंतु संध्याकाळींच माझ्याबरोबर अतिशय चोखंदळपणें त्यानें माझ्या नाटकाची सविस्तर चर्चा केली. मी वाचलेला शब्द न् शब्द त्यानें नीट ऐकला होता !

---

## सेवेची सत्ता

आजच्या काळांत राज्य हें प्राज्य असतें. कारण तें प्रजेचें, लोकांचें, असतें. पूर्वीच्या काळीं जो लोकांना कह्यांत ठेवी, दडपशाही करी, तोच राजा होई. अरण्याचा राजा सिंह असतो, असें म्हटलें जातें. जंगलांतील प्राण्यांना जो खातो, तो त्यांचा राजा, असा याचा अर्थ झाला. जनावरांचा राजा जो सिंह, त्याला संस्कृतांत " मृगराज " म्हणतात. त्या राजाचें दर्शन झाल्याबरोबर सारे मृग थरथर कांपतात. या प्रकारची राज्यसत्ता आतां चालावयाची नाहीं ? आतां राज्यसत्ता ही सेवेची सत्ता असेल. आईला घरांत काय अधिकार असतो ? तिला कोणते हक्क असतात? मुलाला भूक लागली कीं त्याला दूध पाजणें, हा आईचा पहिला हक्क. मुलाला झोपवून नंतर झोपणें, हा हक्क नंबर दोन. मुलगा आजारी पडला तर रात्रीं जागणें हा हक्क नंबर तीन, आणि घरांत खाण्याच्या वस्तु कमी असल्या तर पहिल्यांदा मुलाला खाऊं घालून थोडेसें उरलें तर तें खाणें अथवा न उरलें तर उपाशी राहणें हा हक्क नंबर चार. मातेचे हक्क असे असतात. आज आमचें मातृराज्य आहे ना ? मग त्याचे नमुने गांवोगांव दाखवावयाला पाहिजेत.

— विनोबा



अनुक्रमणिका







प्रा. पां. ना. कुलकर्णी

# मनाचें चरित्र : २ :

## ' रसाळ साजीरी कथा हे '

' कायापुरनगरी'मध्यें ' मन राजा राज्य ' करीत होता. संकल्प आणि विकल्प हे त्याचे दोन प्रधान. त्याला ' प्रवृती नीवृती दोघी राणीया ' पण ' प्रवृतीचें लावण्य देखोनी भुलला ' होता तो. लवकरच निवृत्तीस त्यानें ' बाहेर घातलें ' आणि तिनें मग ' निरंजना बीजें केलें. ' यावेळीं ती गरोदर होती. निरंजनपुरांत एक सुंदर आश्रम करून ती राहिली. तिचा भाऊ ' परमार्थ ' जवळ राहिला होता.

इकडे प्रवृत्तीचा बंधु ' भ्रम ' विनोद दाखवून मनाला आपलाच छंद लावता झाला. कित्येक दिवसांनीं प्रवृत्तीला संतती झाली. ' वडिल मोहो प्रसीध्द । तया धाकुटा काम क्रोध । डंभ मछर आणी मद । लोभ प्रसीध्द धाकुटा ॥ ' असे सात पुत्र आणि लावण्यवती पण दुराचारी व अविचारी ' आशा त्रुष्णा कल्पना । भ्रांती ईछा वासना । ' अशा सहा कन्या प्रवृत्ति प्रसवली. या सर्वांचें ' धायपणें ' ' दुर्बुधी ' करीत होती. हीं मुलें ' अवीवेक आणि अवनीती । तयासी वीशेष खेळती ' आणि ' अवक्रीया ते जागती । उभी संतत त्यापासी '. ' प्रपंचीक ' जनांची वासना या कुमरांवर फार होती. या मुलांना ' वीशयाचें भातुकें । दुर्बुधी देतसे कौतुकें । तें फार करूनीयां नीकें । उल्हासें सकळीके सेवीती '.

पुढें बहुत दिवस क्रमिल्यानंतर एके दिवशीं मोहाला राज्य द्यावें असा प्रवृत्तीनें मनापुढें प्रस्ताव मांडला. शिवाय " पुर्वज अहंकार अमुचा । तोची प्रधान करू मोहाचा । राज्य चालउ जाणे साचा । तो अहंमतीचा वेगळा ॥ ३५ ॥ अणिक येक दुजा प्रधान । माझा पीता होय अज्ञान । तो मोहातें हाती धरुन । राज्य संपुर्ण चालवील ॥ ३६ ॥ " असेंहि तिनें सुचविलें ... मोहाच्या विवाहहि करण्याच्या इच्छेनें पुनः प्रवृत्ति म्हणाली, " मेळउं सोयेरा सधर । तिही लोकी जी थोर । देखा साचार प्रपंचु ॥ ४१ ॥ त्यासी सोईरीक करीतां । मज बरवें वाटे नृपनाथा । ... या प्रपंचाची कन्या नागरी । भुली नांवें अती सुंदरी । तेंचि करूं जी नोवरी । अती साजीरी मोहासी ॥ ४४ ॥ ... आणि मी सुनमुख देखेन । तीचे हाती घरोवा लावीन । तें भुलवील संपुर्ण । भल्या भल्या विरक्तां ॥ ४८ ॥". नृपनाथाला हें आवडलें. संकल्पविकल्प या प्रधानांना विचारितां त्यांनींहि संमति दिली. मन राजा ' मग फोडिता जाहला भांडारें ॥ ५६ ॥ तिं वीशयभांडारें अगाध । शद्ब स्पर्श रूप रस गंध । उचीत दिधले प्रसीध्द । मनें सुबध जनासी ॥ ५७ ॥ '. ' प्रपंचा'ला शीघ्र पाचारिलें, त्याची ' भुली ' कन्याहि सत्वर आणविली.

## ' ऐसें लग्न लागलें '

' मग पाहुनियां मुहुर्त । मुलिसी प्रपंच हाती धरीत । अज्ञान उभा संतत । मोहो जेथें त्यापाठीं ॥ ६० ॥ भ्रमे अक्षता घेतलीया । दोघाचीये अजुंळि ( अंजुळी ) सुदलीया । वों पुण्य म्हणउनी घातलीया । अवीवेकें तया मस्तकीं ॥ ६१ ॥ प्रपंचाची स्त्री वीस्मृती । ते धार घालि यथानीगुती । आशात्रुष्णादि समस्तीं । वोवाळीती कुरंवंडी ॥ ६२ ॥ ऐसें लग्न लागलें । दीसे वोन्हारे चांगलें । मग बोहुलीयावरी बैसवीलें । तें वोहंवारे भलें हव्यासाचें ॥ ६३ ॥ अवक्रीयेचें काकण । अवनितीचे लोण । तयाचे पालवी संपुर्ण । बांधले जाण दुर्बुध्धी ॥ ६४ ॥ तया मोहा भुली सेशपाट । भरी प्रवृती मन सुभट । मग प्रपंच धरुनीयां नेटे । राजबीदीं नीट मीरवीली ॥ ६५ ॥ लोकीकाची राजबीदी । मेळउनि भेदाचि मादी ( मांदी ) । जालि ग्रहप्रेवेशसिध्धी । कुबुध्धीकुतकींचि ॥ ६६ ॥ '

## ' मोहा बैसवीती सींह्यासनी '

' कुळ तेंची सींह्यासन । सीळ ते मृदु आसन । तेथें मोहोराजा आंणुन । मुहुर्तें जाण बैसवीला ॥ ७० ॥ मान्यतेचा टीळकु लल्हाटीं । दुख उद्वेग कुंडलें गोमटी । ... प्रळाप देखा चंदन । सर्वांगासि केलें लेपन । वरी











परिमळद्रव्य जाण । परिपुर्ण लोभाचें ॥ ७२ ॥ तयावरी कंठमाळा । अवीद्येचीया सुढाळा । तेणे तेजें ढळढळा । चीकासलें जगत्रय ॥ ७३ ॥ ह्रदयावरि चींतापदक । शोभा दावी अलोलीक । वरि सुमनमाळा देख । अती चोख प्रमदाची ॥ ७४ ॥ लालुप्याची बाहुभुषण । लटीकेपणाची कांकणे । आपुला संशयो मने । मुद्रिका तेणें दिधली ॥ ७५ ॥ कटीसुत्र नेटापाटाचें । राया कंठी शोभे साचें । चरणी गर्जना वांकीचें । अती नींदेचे अशुची ॥ ७६ ॥ नींदा हाची तोडर । करि नींदेचा गजर । मी माझेपणाचा सुंदर । मनोहर पादुका ॥ ७७ ॥ वीकाराची अंगि साजीरी । आवीचारचीरा त्यावरी । प्रपंच पांघुरवीला आपुले करी ।... जातिवर्ण आश्रम । तेंची छेत्रेचामर उतम । मेघडंबरे अनुपम्ये । महत्वाचें रम्य शोभत ॥ ७९ ॥ रुढपणे तें कीर्तीमुख । शोभे रायासन्मुख । असंतोषाचे कुचे सुरेख । दोंहिं भागि देख शोभती ॥ ८० ॥ हिंसा शस्त्र शोभे करी । घातक सुरि कटावरि । चंचळ दर्पण भारी । भेद करी साजीरा ॥ ८१ ॥ तारुंण्य वय तें धन । जपतप नाना खाद्यपक्वान्न । त्रीवीध ताप दीपन । दीवटी सुलक्षण रायापासी ॥ ८२ ॥ कठीणत्व तें नेत्रधारी ( वेत्रधारी ? ) । अपकिर्ती बंदीजन समोरी । पुढे अपसरा नाचती सुंदरी । अती अवीचारी कुकर्माच्या ॥ ८३ ॥ दुंदभी आणी भेरी । रजतमाच्या वाजती गजरी । तो नाद त्रैलोक्यामाझारी । भरोनी भारी दाटला ॥ ८४ ॥ गुढीया तोरणें साजीरी । अपस्तुतीची घरोघरी । सडे रंगमाळा भारी । दारोदारी शोभती ॥ ८५ ॥ '. 'अहंकार' व 'अज्ञान' हे मोहाचे प्रधान झाले. 'भ्रम' व 'अवीवेक' हे 'सभेचे मंडळीक' बनले. निवृत्तीचे कोणी 'सोहदर' आल्यास त्यांना दंडावें असा आदेश आपल्या पुत्रांना प्रवृत्ति देऊन ठेवते. त्यासाठीं

## 'देशदुर्गे तयासी दिद्‌ली'

'सकळ राज्य मोहा अत्धीन । प्रधानाचेनी अनुमते जाण । कामा अधीन केलें सीश्न । नेत्र स्छान क्रोधाचें ॥ ९४ ॥ जींव्हा समर्पीली लोभा । मद मानेवरी केला उभा । ह्रदयाचा गाभा । मछर स्वयंभा दीधला ॥ ९५ ॥ डंभा वोपीली त्वचा । प्रपंच बैसवीला जेथे वाचा । भ्रमा आणी अवीवेकाचा । राब त्याचा पैं तेथें ॥ ९६ ॥' आणि मन ? 'मग अपण समीप मने । स्वाधीन ठेवीली दाहा वदन । तयाची नावें सावधान । आईका श्रवणे श्रोते हो ॥ १०१ ॥ श्रोत्र त्वचा चक्षु जीव्हा घ्राण । वाचा पाणी पाद गुद सीश्न । ईतुकी समागमे घेऊन । घरटी अनुदीन घालीत ॥ १०२ ॥' ज्यावेळीं ज्याची आवड त्याच्याच नादांत मन गुंतून राहूं लागलें. केव्हां या वाहनांशिवायहि क्षणांत तें त्रिभुवन हिंडून येई. सारांश मोहाचें राज्य चालूं झालें आणि सर्वत्र प्रवृत्तीचीच सत्ता दिसूं लागली. ( प्र. २ ).

## 'निवृती नीरंजनी आसतां ।
## तेथें अपुर्व काये वर्तलें ?'

निरंजनीं निवृत्ति प्रसूत झाली. 'प्रथम चौघी कन्या जालीया । भक्ति शांति क्षमा दया । जवळी सुबुधी असे धाया । बहिण राया मनाची ॥ २ ॥ तया उपरी सीघ्र । उपजले पांचहि पुत्र । भाव वैराग्य वीचार । वीवेक सुंदर । आणी नीजबोधु ॥ ३ ॥' मुलें वाढूं लागलीं. त्यांचे खेळ सुरूं झाले आणि ते पाहून निवृत्तीला आनंद होई. त्यांना दृष्ट लागेल म्हणून ती विषय वोवाळून टाकी. प्रवृत्तीच कोणी हेर मुलांना पाहतील म्हणून निवृत्तीचा भाऊ परमार्थ निरंतर त्यांच्या समवेत राहूं लागला. खेळत असतांना एके दिवशीं 'साधुकुमरें' त्यांना हंसून म्हणालीं, "तुमची नीवृती जननी । भ्रतार ( रें ) तजुनी सांडीली ॥ २२ ॥ मन राजा तुमचा पीता । तयाची प्रवृतीवरीच वास्ता । राज्य दीधलें तीयेचे सुता । तुम्हा सर्वथा टाकीलें ॥ २३ ॥". हें ऐकून निवृत्तिनंदन 'चवंकले'. आईजवळ येऊन ते विचारूं लागले, "तुं तंव पट्टाची भाज । कवण अन्याव ठेवीला तुज । प्रवृतीसी घरीलें गुज । तें सकळ बीज सांग माते ॥ २७ ॥." 'नीवृती गहिंवरली नयने' आणि म्हणाली, "अैका हित देखा सांगतें ॥ ३० ॥ प्रवृतीची गोष्टी न काढावी । मनाची वार्ता सांडावी । राज्याची आस न धरावी । तें कारण जीवीं अैका पां ॥ ३१ ॥ कवणि प्रवृतीचें अैकती । तरी आम्हात्रें दंडीती । आणी तुमचीया प्राणा घतती । हे नीश्चीती जाणा पां ॥ ३२ ॥". मुलांनीं विचारिलें, "येवढा धाक कां धरीला मनी ?" माता म्हणाली,

## "मुळ अैका कथा । तया नृपनाथा मनाची

पहिलें निर्गुणापासुनी हें क्षत्र । निर्माण जाहले वीचीत्र । तेथे त्रीगुणाचा वीस्तार । वीस्तारला ॥ ३६ ॥ तेची सत्व रज तम जाणावें । वाढीनलें सावेव । तेथें



अनुक्रमणिका







नीपजली पंचेवीस तत्वें । शक्तीसमुदाये पंचभुती ॥ ३७ ॥ अक्षर होते तें क्षरलें । वीस्तारुनीयां जाहलें । पींड ब्रह्मांड भलें सावेव ॥ ३८ ॥ अव्यक्त तेंची अक्षर । व्यक्तीसी आलें म्हणउनि क्षर । या दोहिसी साचार । संग सार क्षेत्राचा ॥ ३९ ॥ येथें प्रपंच वीस्तारला अद्भुत । त्या वीस्तारा नाही गणीत । म्हणउनी क्षेत्र बोलीजेत । यालागि नेमस्त पुर असें ॥ ४० ॥ ... असें पंचभुतीक हें क्षत्र । तेथें मन नृपवर । राज्य चालवी सुंदर । अती चतुर चपळपणें ॥ ४२ ॥ ... इंद्रीयाणां मनश्चास्मी ॥ असें ॥ असें गितेमाजी बोलीलें रुशीकेशे । म्हणउनि तत्वामाजी परीयेसें । अती वीशेश वरीष्ट ॥ ४५ ॥' प्रथम मीच त्याची पट्टराणी होतें. पण 'अज्ञानाची कुंवरी' प्रवृत्ति जशी त्यानें वरली तसा तो तिच्या तंत्रानें चालूं लागला. मला बाहेर घातलें त्यानें आणि मग मी येथें आलें, 'तै मी वहीले सगर्भे'. तिकडे प्रवृत्तीला सात पुत्र आणि सहा कन्या झाल्या. आतां त्यांनीं मोहास राज्यीं स्थापिलें आहे. प्रवृत्तीचे दूत येथेंहि हिंडत असतील तरी 'त्याची गोष्टी झणे काढा." मुलांना हंसूं आलें आणि ते म्हणाले, "'त्याचे भंय न दावी आम्हासी । राज्य घेउं सायासी.' तुझ्या वडिलांना–ज्ञानास–प्रधान करूं. तरी ज्ञानास भक्ति व भाव यांच्यामार्फत मूळ पाठवावें. एवढी एक गोष्ट तूं कर." (प्र. ३).

## 'ज्ञान आलींयांवरी । बोध होईल राज्याधीकारी'

ज्ञानाकडे जायच्या वेळीं भक्ति म्हणाली, "नवविधा प्रकारांनीं ज्ञानाची पूजा करून मी त्याला घेऊन येईन." भक्ति व भाव निघाले. 'ती उभयवर्गे सुरेखे । सोहंमेळें चालती हरीखें । भक्ती पुढे चवंके । माघे कवतुक भावार्थे ॥ ७ ॥.' ज्ञानाजवळ जातांच 'तंव भक्ति भाव वेगी । नमस्कारीती साष्टांगीं । नववीध पुजा तयालागि । देती वेगी तें काळीं ॥ ९ ॥ वेदांतशास्त्र बहुत श्रवण । संतवचने सावधान अैकणे । तीची तया कर्णभुशणे । दोघेजण प्रीतीकरुन घालीती ॥ १० ॥ कीर्तन तें दक्षणा । अती उपमा नाही गणणा । ते समर्पीली जाणा । तेणें ज्ञान उल्हासें ॥ ११ ॥ स्मरणाची खाद्यभोजें । तयापुढे ठेवीली वोजें । तें ज्ञाने दृष्टी देखीजे । आनंद उपजे पाहतांची ॥ १२ ॥ पादशेवन पादुका । अती सीधीदायका । चरणी घातलीया सुरेखा । आदरें देखा तें काळीं ॥ १३ ॥ अर्चन बरवें चंदने । सर्वांगा केले लेपन । वंदन तें सुमन । चरणी जाण वाईलें ॥ १४ ॥ दास्य हें नाना उपचार । सख्य हें वस्त्र पीतांबर । पांघुरवीलें सपुर । तेणें सुख थोर तयासी ॥ १५ ॥ आत्मनिवेदन नैवेद्य । पुढे ठेवीला आगाध । तें देखताची शुध्द । ज्ञाना आनंद पै जाहला ॥ १६ ॥ प्रेमाचीया रत्नमाळा । घातली तयाचीया गळा । प्रीतीचिया तांबोला । मुखकमळा शोभीवंत ॥ १७ ॥ अैसी भक्ती पुजा करी भावें । ते तें स्छळी भाव दृढावें । तें देखोनी स्वभावें । ज्ञान मानवे तयासी ॥ १८ ॥' 'ज्ञानेश्वर' संतुष्ट झाला. "कवणा कार्या तुम्हातें । नीवृतीने पाठवीलें येथें । ?" असा प्रश्न त्यानें विचारिला. "सर्व सांगत बसलों तर वेळ लागेल. सर्व गोष्टी तेथेंच आपल्यास समजतील." असें म्हणून भावभक्तींनीं त्वरा चालविली. ज्ञानाच्या अगमनानंतर सर्वांनीं त्याला नमस्कार केला. त्यानें मग पृच्छा केली. "कवणा कार्या मज बोलावीलें । काय अवघड असे मांडलें ?" मागचा इतिहास व राज्य मिळविण्याची मुलांची इच्छा निवृत्तीनें ज्ञानास निवेदिली. त्याला मुलांची इच्छा पसंत पडली. तो म्हणाला, "आतां भाग्य उदयो जाला । कांहि चांगला या क्षेत्राचा ॥ ४७ ॥ प्रवृती आणि प्रवृतीच्या कुमारी ।

## या क्षेत्राची केली बोहरी ।

जग गोवीले आपणाहारी । मन ही भारी व्यापीलें ॥ ४८ ॥ आणी हीं दश ईंद्रीयें । लावीली वीशयाची सोये । नेणती कार्याकार्य । अनेअन तीहि केलें ॥ ४९ ॥ नीती तीहीं उलंघीली । सत्यक्रीया तेहीं बुडवीली । अवक्रीयेचि बहुत केली । तिही चाली क्षत्रामाजी ॥ ५० ॥ सुबुधी नाहि तयापासी । कुबुधी नांदे अहिर्णीसी । नीती दवडुनी अवनीतीसी । पाळीलें तीसी आहे पैं दृढ ॥ ५१ ॥ अैसी दुर्जने तें ठाईंची ।" शेवटीं निवृत्तीच्या पुत्रांना राज्य मिळावें म्हणून साहाय्य करण्याचें आश्वासन देऊन पूर्वतयारीच्या दृष्टीनें तो पुढील सूचना करतो,

## 'अैसी ज्ञानवचने'

"तरी संतोशातें हाकारा । आणि ते नीतीते पाचारा । जीचेनी अवनितीचा थारा । मोडावा खरा नीर्धारें ॥ ५६ ॥ आनंदा द्यावा मान । हर्श आसो द्यावा अनुदीन । चींता हे दवडुन जवळुनि पैं घालावी ॥ ५७ ॥ संतवचन पाळावी । दुष्टाची बुधी नाईकावी । आणि संगती धरावी । दृढ बरवी साधुची ॥ ५८ ॥

पाळावी नीरापेक्षता । तजावी लालुप्यता । करुणा सर्व-भुती आतां । सर्वथा पैं आसावी ॥ ५९ ॥ सदा संतुष्ट आसावें । असंतुष्टत्व दवडावे । सुखदुखि न व्हावें । व्याकुळ स्वभावें कदाचीत ॥ ६० ॥ ". निवृत्तीनें हें मानलें आणि आपलीं मुलें ज्ञानाच्या हातीं दिलीं. ते कुमरहि ज्ञानाचीं पादारविंदें सेवून त्याच्या शब्दाप्रमाणें चालूं लागले.पुनः निवृत्तीनें विचारिलें,

**" राज्य द्यावे कवणा पुत्रासी ? "**

मग बहुतांसमवेत 'आलोच' करून ज्ञान म्हणाला, " भाव तरी सकळाहुनि वडील । तो येकेचि स्थळीं भाव गुंफेल । व्यापकपणे केवी वर्तेल । राज्य चालवील कैसेनी ॥ ६९ ॥ वैराग्य तरी नाहि हांव । वीरक्त तयाचा मनोभाव । तो केवी चालवील अपुर्व । हे राज्यराणिव क्षेत्राची ॥ ७० ॥ वीचाराची यकची परी । आहोरात्र वीचार करी । तो केवी सांवरी । राज्य भारी येथीचें ॥ ७१ ॥ वीवेका सांगावा वीवेके । तयासि हें राज्य न टके । तरी बोधासी राज्य कवतीकें । देतां नीकें मज वाटत ॥ ७२ ॥ तो धाकुटा तरी होय । परि व्यापकत्व तया बोलणे आहे । स्वानुभवसुखाचि सोये । तोचि पाहे जाणतु ॥ ७३ ॥ " ( प्र. ४ ).

ज्ञान सर्वांना पुन: म्हणाला,

**" निजबोध नेटका । त्याचे गुण** देखा वर्णीन ॥ १ ॥' गुणवंत, अति शांत, रंक व समर्थ यांना सारखेच मानणारा, साजऱ्या स्वरूपाचा, सर्व लक्षणांनीं परिपूर्ण, आजानुबाहु, हास्यवदन, दृढ आसनी, 'उन्मीळित' नयनांचा, योगयुक्त, राज-लक्षणी, आपपर न मानणारा, विरक्त, ऐक्यभावानें ओतलेला अद्वैताचा पुतळा, साधुजनांचा विसावा, चारी देहांचा जाणता, चारी अवस्था भोगून अभोक्ता, चारी पुरुषार्थांची खूण जाणणारा, चारीहि मुक्ति भोग-णारा, 'तत्त्वमसि' महावाक्याचा अर्थ जाणणारा, निरंतर स्वरूपाचें अनुसंधान राखणारा, नाना विकारांत न गुंतणारा, 'कर्माकर्म वीचार । ते जया ब्रह्म साचार । विकाराचा अंकुर । मनी साचार न देखें पैं ॥ ११ ॥ कर्म ब्रह्माची प्रतिती । ऐसि जयाची निश्चळ मती । बोधलेंपणे चीतवृती । डंडळ ना चितीं सुचीत ॥ १२ ॥ जन हेंची जनार्दन । ऐसे जयाचें अखंड ध्यान । तयापासी अनुमान । अनुदीन असेना ॥ १३ ॥ पुर्याष्टकाचा* जाणता । साहि वीकाराचा ज्ञाता । परी कवणेवीसी अहंता । न धरी सर्वथा मानसी ॥ १४ ॥' ... ज्याची नित्य चौथी अवस्था असा तो आहे. 'ऐसा तो निजबोधु । बोधलेपणे सबोधु । आनंदरूप स्वानंदु । आनंदकंदु सुखाचा ॥ २१ ॥ सकळ भोगुनि अभोक्ता । सर्वेही करूनी अकर्ता । वीस्व देखे देखता । तदृपता आत्मत्वें ॥ २२ ॥ वीश्वीं वीश्वात्मा पुर्ण । हें अनुभवें जाणे खुण । ऐसी स्थीती संपुर्ण । जाणे खुण तयाची ॥ २३ ॥ ... ऐसा सलक्षणिक साजीरा । तेजोन्मय ज्ञानाचा हीरा । तयावेगळा सोयरा । आणिक दुसरा न दीसें ॥ २५ ॥ ' ". निवृत्तीला ही योजना मान्य झाली. पण याचवेळीं परमार्थानें सुच-विलें कीं बोध जोंपर्यंत 'सापत्नीक' नाहीं तोंपयत राज्याला योग्य नव्हे, तरी त्याचा आधीं विवाह करावा. 'नोवरी'चा विचार करूं लागले. तेव्हां निवृत्ति आणि विवेकादि म्हणाले,

**" 'नोवरी आहे जी सुरेख '**

तशीच सगुण आणि सुलक्षणी. ती योग्यांची विश्रांति आहे. 'अबोलणेपणे शाहणि । आखंड डुलत आसनी । वीरक्ताची स्वामीणी । बोधा लाहाणी अती पाडें ॥ ३४ ॥'

---

* 'पुर्याष्टक' हा शब्द येथें व पुढें प्र. १३ – ओं. ६२ मध्यें ( पुर्या आष्टकाचें खंडण । जाहलें तुटलें बंधन । ) आलेला आहे. माझे मित्र व राजाराम कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक, 'श्रीगुरुदत्तयोग अर्थात् शक्तिपातरहस्य' या ग्रंथाचे लेखक श्री. शं. खानवेलकर, एम्. ए., यांना या शब्दाविषयीं खुलासा करण्याबद्दल मी विनंती केली होती. ता. ५-९-५७ च्या पत्रांत ते मला लिहितात, " ... 'मनचरित्र' हा सर्व ग्रंथ पाहिल्याशिवाय आपण म्हणतां त्या ओव्यांचा Exact अर्थ सांगतां येणार नाहीं. तत्रापि, आपल्या शरीरांत, पिंडीं तें ब्रह्मांडीं या न्यायानें खब्रह्मांड, परा ब्रह्मांड व अपरा ब्रह्मांड अशीं तीन ब्रह्मांडें आहेत, व त्यांत अनेक नगरें, ( पुरीं ) आहेत असे संदर्भ अनेक ठिकाणीं आहेत. आठ पुरीं, आठ नगरें, म्हणजे ( पंचविषय + अहंकार + चित्त + मन ) = ८ असें असावें किंवा पंचविषय + ३ ब्रह्माण्डें असावींत. लेखकाचा योगसंप्रदाय कळला कीं तें स्पष्ट होतें. हीं आठ पुरें किंवा हे आठ कप्पे शरीरांत गुरुकृपेनें दिसतात असाहि उल्लेख आहे. यापेक्षां जास्त लिहिण्याची अनुज्ञा नाहीं. नाहींतर स्पष्ट केलें असतें. ... "



अनुक्रमणिका






ती ‘ आनंद ’ व ‘ विश्रांति ’ यांची सर्वांत धाकटी कन्या. ‘ जागृती, स्वप्न, शुषुती आणि तुर्या ’ या चौघींहून ती धाकटी. ‘ जोतीष वर्तीलें ब्रम्ह्यानी । तीयेचें नांव नीघालें उन्मनी. ’ बापानें तेंच नांव ठेवलें. संतजनांनाहि नांव आवडलें. ” मग आनंदाला पाचारण्यांत आलें. त्याला हा संबंध आवडला.

**‘ अैसी संपादीली लग्नसित्धी ’**

“ मग लग्न पाहुनी त्वरीते । आनंदे आरंभीलें उचीत। बोधाकारणें वीधीयुक्त । कन्यादान त्वरीत माडीलें ( मां?) ॥ ४३ ॥ मधुपर्कें पुजा वोजें । आनंदे केली सहजे । शोडश उपचार पुजीजे । स्वानंद सहजे स्वभावें ॥ ४४॥ मग तो आनंदा त्वरीत । उन्मनीसि हाती धरीत। ज्ञान उभे संतत । बोध जेथें त्या पाटी ॥ ४५॥ भक्ती भावें अंत्रपाट धरीला । ते देखोनी परमार्थ मानवला। तवं धीर बोलिला । सावधान भला म्हणउनी ॥ ४६॥ वैराग्यें अक्षता घेतलीया । संतोशे माथा घातलिया । ॐ पुण्य म्हणउनीयां । घडवटे घडि राहीली ॥ ४७॥ वीश्रांती आनंदाची राणी । ते धार घाली तये क्षणी। धृती स्छीती सोवासिणी। सभवंत्या येउनी उभ्या असे ॥ ४८॥ तेथें नाना ध्वनीचीया वाजंत्रे। ध्यानाचीया युक्ती साजीरें । अैके त्याचें मन मुरे। ध्यानभरें ब्रह्मांडी ॥ ४९॥ ॐ पुण्याचेनी भारी । वीवेक अंत्रपाट काढी झडकरी । मग सहजाचीये बोवल्यावरी । तीं वोहोरें भारी बैसती ॥ ५० ॥ संशयाचा धकार । निर्धारे केला आपार । तेणें नीवृत्ती सुंदर । देखोनी थोर उल्हासें ॥ ५१ ॥ अभीमानाचे लोण । सांडीलें पै वोवाळुन । तंव आचार्यें लज्याहोमहावन। संपादुने सांडीलें ॥ ५२॥ कंकणें बांधीली करीं । स्वानुभवाची साजीरी । पदरी गांठी पडली येकसरीं । अद्दीक्याची भारी वधुवरा ॥ ५३ ॥ धृती स्छिती सोवासीणि । आणी ते नीवृत्ती जननी । शेष भरीती येउनी । थोर मनी संभ्रमे ॥ ५४ ॥ चौघी वाचा तये क्षणि । परतोनी गेलीया कुरवंडी करुनी । स्वप्न जाग्रुती मेहुणी । त्या लाजुनी राहील्या ॥ ५५ ॥ तुर्या चौथी जगवीख्याती । उन्मनीची सखी आवडती । साक्षत्वें त्या दोघाप्रती । उभी जागत पाहातसे ॥ ५६ ॥ तुर्येचेनी संगातें । तें वोंहारे शोभतें । आणि देखोनी त्या वोन्हरातें । तुर्या यथार्थ उल्हासे ॥ ५७ ॥ तेथें वीधीनिशेध दोन्हि । ते नातळति असोनी । दुजेपणे नीघोनी । गेलें परतें तें काळी ॥ ५८ ॥ च्याऱ्ही मुक्ती च्यारी दीवस । चतुर्थी संपादीली सावकास । सत्वगुणाचे साडे सुरस । जाहले व ( ब ? ) हुवस संतोश ॥ ५९ ॥ अैसी संपादीली लग्नसित्धी । त्रीकांडवीहित आचार्यंवीधी । वेदांताचा नीजबीदी । वोहोरें बुधी मीरवली ॥ ६० ॥ सांख्याचा ग्रहप्रवेश । तया जाहला सावकाश । द्वैतमादीया ( मां ? ) होत्या बहुवस । त्या समरस जाहालीयां ॥ ६१ ॥ भेदाचा भास तुटला । अैक्यें जोडा येक जाहला । समाधीस्त राहीला । हे जाणती कळा अनुभवीये ॥ ६२ ॥ मग संतोशे ते क्षणी । धेंडा नाचवीला सम आंगणि । संतवऱ्हाडि वोवाळणि । वीधीनीशेध दोन्ही घालीती ॥ ६३ ॥ ”. बोध व उन्मनी यांच्या प्रीतीला उपमाच नाहीं. आतां बोधाला राज्याभिषेक करावयाचें ठरतें. ( या राज्याभिषेक वर्णनांतहि कवीनें आध्यात्मिक रूपकांचा थाट चांगलाच उठविला आहे. ७६-९६. ) लौकरच ‘ राजी स्थापीला बोधराजेंद्र. ’ निवृत्तीच्या विनंतीप्रमाणें ज्ञानानें प्रधानपदाचा स्वीकार केला. बोधाचे रक्षक म्हणून ‘ भाव, वैराग्य, वीचार, वीवेक ’ यांची आणि सभेचे नाईक म्हणून ‘ धीर, परमार्थादीक, आनंद ’ यांची ज्ञानानें योजना केली. त्यांना निरनिराळीं ‘ देसदुर्गे ’ वांटून दिलीं आणि हें सर्व पाहून निवृत्ति आनंदली. (प्र. ५).

**‘ मोहासमीप आतां । दुत सांगतील वार्ता ’**

गुप्तपणें विचरत असलेल्या धूर्त दूतांनीं निवृत्तीकडील सर्व वृत्त मोहराजाला कळविलें. बोधाच्या अधिकाऱ्यांचीं नांवें सांगितल्यावर दूत म्हणाले, “ सदासमभारे सन्नध । आहोरात्र आसती सावध । तयासि कवण करी द्वंद। तें आगाध नागवती ॥ १६ ॥ तया घरी भक्तिची सता । तेथें वीवेक आहे जाणता । वीचाराची सबळता । भाव दृढता वैराग्यसी ॥ १७ ॥ तेथें धीर तो बळकट । कवणा नाकळे आदट । तयावरी ज्ञान सुभट। पाहाता मुगुट सर्वाचा ॥ १८ ॥ तेथें आनंद वावरे । हर्श संतोशहिं वीचरे । तेणे निवृतीसी बळे पुरें । अति नीर्धारे जालें असे ॥ १९ ॥... अैसे सबळ जाले निवृतीसुत । तुम्ही आझुणि कां सुचीत । ”. हें ऐकून

**‘ दुस्चीत जाहला मोहो रावो ’**

आणि म्हणाला, “ वैरी प्रबल झाले. आतां काय उपाय करावा तें सांगा. ” यावर ‘ अहंकार ’, ‘ अज्ञान ’,

'काम,' 'क्रोध,' 'लोभ,' 'मद,' 'द्वेश,' 'भ्रम,' इत्यादि 'आपुलाला पुरुशार्थ। रायापासी बोलीले समस्त'. आपल्या सहा कन्यांना हाताशीं धरून प्रवृत्ति बोलली, "माझी नेणसी रे माया। हे जग आचरे माझी क्रीया। येव्हडे माझे सामर्थ्य सावया। मीं रंका राया गोवीतें ॥ ४९ ॥ शास्त्रें माझीये सोईं चालती। पुराणेंहिं माझे गुण गाती। मीमुळें असे नीश्चीती। आदी अंती चराचरी ॥ ५० ॥ मुख्य ब्रह्मं अैसें अैकीलें। तेहिं म्या पुरुषत्वा आणीलें। आवतार नाना जालें। तें गुंपलें माझेनी ॥ ५१ ॥..." तिच्या कन्यांनींहि आपापलें बळ राजाला सांगितलें. मोहाला आनंद झाला आणि मग त्यानेंहि आपला पुरुषार्थ प्रधानांना सांगितला,

**'मज मोहाचि महिमा अैसी'**

"मी मोह करीता राणीव। मोहे गोवीलें ब्रह्मादीक देव।... मुख्ये वीष्णुच वेडा लवीला। भक्ताचेनि मोहें गुंफला। कांहि सांग पा या बोला। अन्यथा वहिला असेना ॥ ६६ ॥ भक्ताचेनि मोहे गुंपत। येकाचे द्वारी तीष्टत॥ येकाची सेवा करीत। लाज बहुत सांडुनी ॥ ६७ ॥ येकाच्या गाई राखे आवडी। येकाची धुतसे घोडी। नाना आपदि काढी। लवडसवडी येकासि ॥ ६८ ॥ तो तवं पाहता नीर्गुण। भक्ताकारणे जाला सगुण। येवढें माझें वींदाण। जाणति जाण सज्ञान पैं ॥ ६९ ॥ ब्रंम्हादी पुरंदर। मोहें करिती आपुलाला व्यापार। तेहिं मोहे मोहीलें थोर। कीती सांगो आपार हे जाणसी सर्वज्ञा ॥ ७० ॥ कींन्नर गण गंधर्व। यक्ष राक्षेस मानवे। ते म्या गोवीलें सर्व। ते लाघव काय सांगो ॥ ७१ ॥ येरां जनाचा काय लेखा। तें तवं माझेचि अंकीत देखा। स्थावरजंगमादीका। म्यां गोउनि देखा पाडीलें ॥ ७२ ॥ वडील आमचा पिता मन। तोची जाला मज आधीन। तेथें नीव्रत्तीचे नंदने। कायसी दीन बापुडी ॥ ७३ ॥ ..." यानंतर सर्व वीरांना सावध राहण्याचा आदेश मोह देतो. भांडारें फोडून सर्व वीरांना द्रव्य वाटण्याबद्दल प्रधानाला आज्ञा करतो. (प्र. ६)

**'नीवृतीहेरे ... समस्त देखीलें'**

प्रवृत्तीकडील वरील सर्व वृत्तांत निवृत्तीच्या विचक्षण हेरांनीं ताबडतोब ज्ञानादिकांना सांगितला. हें ऐकून निवृत्ति दुश्चित्त झाली आणि 'तरी यासी वीचार कैसा। करावा जी ज्ञानेशा?' म्हणून तिनें ज्ञानाला विचारलें. ज्ञान, भाव, वैराग्य, विचार, विवेक, परमार्थ, धीर, आनंद, भक्ति, शांति इत्यादिकांचीं वचनें अैकून निवृत्ति संतोषली आणि सर्वांना द्रव्य वाटण्याची तिनें आज्ञा केली. यावेळीं विचारानें सुचविलें, "धर्मशास्त्राचा बोल लागूं नये म्हणून 'सिष्टाई आधी पाठवणें.'" शिष्टाईसाठीं कोणास पाठवावें याचा विचार सुरू झाला. आनंद नित्य आनंदभरित, परमार्थ भोळा, भाव भावार्थी, 'वैराग्यासी बोलणें नावडे', 'वीचार वींवचनेच्या ठाईं अहोरात्र तटस्त', संतोष आणि हर्ष हे राजस राजयोगी म्हणून यांपैकीं कोणालाहि हें काम जमणार नाहीं, म्हणून मग विवेकास या कामीं नियुक्त करण्याची 'ज्ञानेश्वरा'ची योजना सर्वांना मानवली. निवृत्ति विवेकाला म्हणाली, "तुवां शीष्टाईस लागेल जाणें। हें कार्य वेगि करणे। शाहणपणें अवश्य ॥ ७७ ॥ काय म्हणतिल तें अैकावें। कळेल तैसें उतर द्यावें। राज्य आपुलें मागावें। सौम्य भावें करूनी ॥ ७८ ॥ कींवा युध्येवीण नेंदीत। अैसें तऱ्हीं करावे नीश्चीत। दोहिमाजी येक नेमस्त। यावें त्वरीत साधुनी ॥ ७९ ॥" त्याला विडा देऊन आज्ञा दिली. (प्र. ७)

**'आतां सीष्टाईसी जाईल वींवेक।**
**तेची अैका कथाकवतुक'**

मग विवेक 'झडकरून' निघाला. आपला 'सापत्निक' बंधु आला म्हणून मोहानें त्याला 'बैसावया ठावो केला' व 'कवणीकडे बीजें केलें?' असा प्रश्न विचारला. मनांत मात्र शत्रु आला म्हणून तो दुखवला होता. विवेक म्हणाला, "निवृत्तिमाता व ज्ञान यांच्या आदेशाप्रमाणें मी आलों आहे. आम्ही व तुम्ही 'सापत्नीक बंधु', तेव्हां 'राज्याकारणे द्वंदु मिथ्या' होय. वडील स्त्रीच्या पुत्रास राज्य मिळणें हें नीतिशास्त्राला धरून आहे. 'वडील भाज पटाची। नीवृती माता आमुची। प्रवृति तरी सापेची' तेंव्हां 'तुम्हा राज्य आम्हा वनांतरे' हें बरें नाहीं. 'तरी आतां बरवें जालें। जें ईतुकें दिवस राज्य तुम्हीं केलें। तें आम्हासीच पावलें। यासि नाहि अन्यथा वहिलें सर्वथा ॥ ११ ॥'. तथापि तुम्हीं आतां एक करावें कीं हें राज्य बोधास द्यावें आणि 'तुम्ही प्रवृतिसहित स्वभावें। लीन असावें सर्वा ठाईं'. कामक्रोधादि जे तुमचे 'सोहदर' त्यांनाहि एक नगर आम्ही देऊं. त्यांनीं ज्ञानाच्या आज्ञेंत पण तेथेंच स्थिर असावें. तुमच्या मनांत जें

असेल तें मला सांगा." हें ऐकून साहजिकच मोह रागावला आणि त्या भरांतच तो बोलला, "याचा लेखा नाही मज। पाहो नेंदी हे राज्य। अैसी माझी पैज। तुम्हा सहज ठाउकी ॥ ३३ ॥". अहंकार आणि अज्ञान हेहि रागानें बोलले. प्रधानांचा विचार ऐकून मोह राजा संतोषून म्हणाला, "घाला घाला बाहेर। हा वीवेक कुर येथुनीयां." हें ऐकूनहि सामोपचाराची आशा न सोडतां पण धाक दाखविण्याच्या इच्छेनें बोध पुनरपि बोलूं लागला, "मोहा तु बंधु आमचा। म्हणउनि आलो साचा सिष्टाई ॥ ४४ ॥ तरी आमचीया मानसी। वीरोध नसावा परीयेसी। म्हणउनी तुम्हासी। साम्योपचारेसी मागो आलो ॥ ४५ ॥ पर मीं हीत सांगता। कोप आला तुम्हा समस्ता। युध्य करणें हें वास्ता। वसे चीता तुमचीया ॥ ४६ ॥ दुष्ट तुझे प्रधान। अहंकार आणी अज्ञान। याचें उतर तुं अैकोन। कां बंधन पावसी ॥ ४७ ॥ अज्ञान तवं नेणें काहीं। अहंकारासी वीचार नाही। सदा गर्वीष्ट आपुले ठाईं। अहंमती पाहीं करुनीयां ॥ ४८ ॥ तुझे बंधु कामक्रोधादीक। तें तवं ठाईंचेच मुर्ख। नेणती वीचार वीवेक। दुर्जन देख दुराचारी ॥ ४९ ॥ हा मंडळीक भ्रममामा। याने भ्रांती घातली आहे तुम्हा। त्याचेनि मतें तुमची महीमा। घड आम्हा दीसेना ॥ ५० ॥ आणी हे प्रवृतिमाता कुर। ते नीवृतिसी करी सवतिमछर। मनही राजा साचार। तीणें वेडा थोर लावीला ॥ ५१ ॥ नगरामाजी आपुली सता। वाढवी त्वरीता तिही लोकीं ॥ ५२ ॥ आशातृष्णादि तुमच्या बहीणी। त्या तवं कर्कशा पापीणी। या जनातें स्छानस्थानी। वेडा गोउनी लावीलें ॥ ५३ ॥ तुम्हा सकळाचे मानसी। कुबुधी नांवें परीयेसी। आपलें स्वहित कवणासी। नेदा सायासी वावरो ॥ ५४ ॥ समस्ताचेनी मतें। काहिं बरवें न दीसे तुम्हातें। जें होणार हो तें। यासि वीपरीत कवण ॥ ५५ ॥ जे जे होणार जे जे क्षणी। त्यासि वीपरीत करील कोण्ही। बुध्दी कर्मानुसारणी। वीधाता लेखणि न चुके ॥ ५६ ॥... आह्मुणी तरी अैका हित येक। नका धरूं युध्याचें कौतुक। तुमचें वाटीवेचे बीक। नुरे देख संवदळी ॥ ६० ॥' वैराग्यविचारांचे बाण आणि ज्ञानाचें दारुण ज्ञानखड्ग पाहून तुमचा पराक्रम नाहींसा होईल. आनंदपरमार्थांच्या पुढें तुमचा पुरुषार्थ भंगेल. 'मग अैकाल माझी वचने। सुख राहाटाल सेवकपणे। तरी आतां सांगतो सौजन्य। ते दुर्जन हो नाईंका ॥ ६३ ॥." "यासी द्यारे दवडुन" असें मोह दुखवल्या गेलेल्या मनानें म्हणाला. बोध परतला आणि त्यानें सर्वांना निर्णय कळविला कीं, "युध्यावीण आतां। राज्य न ये आमचीया हातां'. ज्ञानाला आनंद झाला. ताबडतोब युद्धाची तयारी सुरू झाली. परमार्थास दळाधिपती करण्यांत आलें. 'मग भाटा नीरोप दीधला। हाकारा केला मोहातें' बंदीजन बोधादिकांचे पवाडे पढूं लागले. ते ऐकून मोहादि खवळले आणि त्यांनींहि आपल्या 'भाटा दिधली पेटवणी'. त्यांचेहि वीर युद्धोन्मुख झाले. प्रपंचास दळाधिपती करण्यांत आलें. (प्र. ८).

## 'येथुनि युध्याचा अवसरु'

दोन्हीं सैन्यें सिद्ध झालीं. आपल्या सैन्याला नाभिकार देत रणरंगधीर वैराग्यवीर पुढें झाला. त्याच्यावर मोठ्या अभिमानानें काम 'लोटला'. 'यावा कैसा तयाचा। कुचा भवंडीला संताचा (वसंताचा ?)। रुणझुण शब्दे भ्रमाचा। कोल्हाळ गाजे ॥ ६ ॥ मंद सुगंध सुसीतळ। तेथे झळके मळयानीळ। तीं छत्रें चामरें सकळ। आभरणादीक ॥ ७ ॥ प्रेम यौवनदशा। नयनकटाक्षवळसा। तीच शस्त्रें परीयेसा। झळके दावीती ॥ ८ ॥ तेथें रुपाच्या वयसा अनेक। काय सांगो भार अलोलीक। ते सैन्य पाहतां वैराग्यादीक। चंवकलें पैं मानसी ॥ ९ ॥' अशा रीतीनें काम रणांगणावर आला. आपलें महिमान सांगतांना तो म्हणाला, "मी अनेकांना जिंकलें आहे. ब्रह्मादिकांना माझा धाक वाटतो. चंद्राला कलंक मी लावला. भगेंद्राची काय अवस्था झाली त्याचा थोडा विचार करा.' उर्वेवंसी' (? वास्तविक मेनका हवें) पाहून विश्वामित्र भुलला ती करणी माझीच. 'नारद रळी करूं गेला। स्नान करीतां स्त्री जाहला। साटी पुत्र प्रसवला। तें वीदांण (विंदाण ?) माझेची ॥ १७ ॥' पाराशर मुनी 'मछोदरी'ला पाहून किंवा शंकर 'भीली'ला पाहून भुलला तोहि प्रताप माझाच. 'कृष्ण अवतार संपुर्ण। त्यास लागलें राधेचे ध्यान। ते महीमान माझेची' ..." वैराग्याला हें ऐकून हंसूं आलें आणि तो म्हणाला, 'आपलें महिमान वानितोस पण अपमान कां सांगत नाहींस ? मी सांगतों अैक. ब्रम्हसुत सनत्कुमाराचा तूं शरणांगत तर वायुसुत हनुमंतानें



अनुक्रमणिका







तुला तोडरीं घातलें. भीष्मदेवाचा तूं ' आंकणा ' तर पूर्वी एकदां शंकरानें तुला भस्मसात् केलें होतें. शुक-देव, कार्तिक स्वामी, गजानन यांना तर तुझी पर्वाच नाहीं. नारदालाहि तूं आवडत नाहींस हें जगाला ठाऊक आहे. संत, महंत, विरक्त, योगेश्वर, ' इंद्रजीत ' यांना ' तुझी नावडे मात '. अशी सर्वांनीं तुझी निंदा करून तुझा त्याग केला असतांहि निलाजरेपणानें कशाला बडबडतोस ? ' तोची तुं रें न लजसी । वांयां वांटीव बोलसी । स्त्रीयामाजी मिरवीसी । पुरुशार्थ आपुलें ॥ ३० ॥ ' ... " क्रोधवश होऊन कामानें अति तिखट व दारुण असें पांच बाण वैराग्यावर सोडले. ' तेणें वैराग्या आली घिरीघीरी '. त्याला ' मुर्छागत ' पाहून विचारानें हात दिला व सावध केला. मग धीर व विचार यांच्या साहाय्यानें बळ चढलेल्या वैराग्यानें विरक्तिनामक शक्ति सोडून कामाचें वर्मांग भेदलें आणि ' केसी धरूनी बांधला '. क्रोध रक्तांबर डोळे करून वैराग्यावर धांवणार तोंच विचार त्याला आडवा आला. क्रोधानेंहि आपला महिमा अनेक उदाहरणें देऊन सांगितला. त्याच्या अपमानाचे प्रसंग सांगून विचारानें त्याचा उपहास केला. मग क्रोधानें ' क्रुर तमीष्टु दोनी बाण ' विचारावर सोडले. विचाराला ' घीरीघीरी ' येऊन ' नावेक गेला चाचरी '. यावेळीं धांवत येऊन शांतीनें त्याला सावध केला. आतां विचारानें विवंचना-नामक शक्ति क्रोधावर सोडली त्यामुळें क्रोध ' मृछीतु जाहला '. विचारानें त्यालाहि बांधलें. मोहाच्या दळीं ' हाहाकारु ' झाला. ( प्र. ९ ) आणि मग–

**' उठाव केला महावीरीं '**

' भ्रम, डंभ, मछर, मद ' परदळावर चालून गेले. त्यांना विवेकानें ' आडवारा ' केला. विवेकावर भ्रमानें ' भ्रांती ' शक्ति, डंभानें ' गर्वाचे बाण ', मछरानें ' कर्कश शस्त्र ' आणि मदानें ' उन्मताचा तोमर ' या शस्त्रांचा मारा केला. विवेकानें त्यांचें अनुक्रमें ' सावध खर्गें ', ' अगर्वचक्रकरूनी ', ' लीहीनत दंडें ' व ' सावध खर्गकरुनी ' निवारण केलें. मग मुक्तीचें खड्ग घेऊन विवेकानें ' भ्रम हाणोन पाडीला ठाईं ठाईं । डंभाची फोडीली डो ँ । मछर हृदईं भेदला ॥ १४ ॥ मदे हाणीतला मानेवरी । '. अशा रीतीनें चौघेहि रणीं आल्याचें पाहून मोह दुःखित झाला. प्रपंच त्याला आश्वासन देऊन सिंहनाद करात रणांगणा-वर आला. त्याच्यावर परमार्थ चालून गेला. एकमे-कांचीं वर्में ते बोलूं लागले. खवळलेल्या प्रपंचानें ' भेद वीशाद ' हे दोन दारुण बाण परमार्थावर सोडले. ते अगीं लागल्यानें परमार्थ ' दुश्चीत ' झाला. क्षमा व दया त्याच्या साहाय्यास धावल्या. मग ' अभेद मुद्गल ' हातीं घेऊन प्रपंचाच्या मस्तकावर परमार्थानें घाव घातला. मूर्छा येऊन पडत असतांच परमार्थानें त्याला बांधून टाकलें व बोधरायाजवळ आणलें. आतां मोहाची आज्ञा घेऊन अहंकार व अज्ञान पुढें झाले. त्यांच्यावर ' ज्ञान ' चालून गेला. ( प्र. १० )

ज्ञानापुढें अहंकार स्वतःची व अज्ञानाची महती सांगतो. इतकेंच नव्हे तर " पाहें पां आत्मतत्व नीर्गुण । पर म्यां बांधला त्रीगुणें करून । ऐसें बोलीले असें जाण । गीतेमाजी गोवींदे ॥ ११ ॥ " असा भगव-दुक्तीचा आधारहि देतो. " आपला ' फुगारा ' कशाला वानितोस ? " असा प्रश्न विचारून ज्ञानहि अनेक पौराणिक संदर्भ देऊन स्वतःचें महत्त्व वर्णितो. अहं-कारानें मग रागावून ' अहंता शस्त्र ' सोडलें. त्यावर ' सहज उदास दोनी बाण ' ज्ञानानें सोडले. त्यामुळें ' अहंकार उलंडला भुमडंळीं. ' त्याला ज्ञानानें बंदी केलें. मग अज्ञानानें ' हींसा शस्त्र ' सोडलें. त्याँच ' अहींस खर्गे ' निवारण करून ज्ञानानें अज्ञानाच्या उरावर घाव मारला. अज्ञानालाहि मूर्छा आली. अशा रीतीनें ' अहंकार बंदी घातला । अज्ञान नगराबाहेरी दवडीला. ' हें सर्व पाहून निवृत्ति संतोषली. मग 'लोभ द्वेश' सरसावले. ' भाव आणी धीर ' यांनीं त्यांना पाचारिलें. लोभाच्या ' लालुप्य शस्त्रा'नें भाव ' घुमींने दाटला. ' भक्तीनें हात देऊन त्याला सावचित्त केला. मग ' निर्धार भाल्या'नें लोभावर घाव केला. व त्याला मूर्छित पाडलें. याच वेळीं ' द्वेश ' व ' धीर ' यांची ' मिळणी ' झाली. द्वेषानें कर्कश शस्त्र सोडलें तर धीरानें धारणा शक्ति सोडून त्याला मूर्छित पाडलें. इतकेंच नव्हे तर द्वेष ' मुकला प्राणा '. मग मोह स्वतःच चालून गेला. ( प्र. ११ ).

**' जैत बोधासी आलें '**

तें पाहून स्वतः ' बोध ' उठला. ' दोघा जाहली भेटी । तवं मोहो बोधासी करी गोष्टी '– " लोक अह-र्निश मला आठवतात. तुझी आठवण क्वचित् एकादा







' तडी तापसी भीकारी ' करतो. खरें म्हणजे ' जगासी जो प्रीय राणा । तोची भुमंडळीचा राणा । प्रीतीवीण कल्पना । कां करणें राज्याची ॥ ८ ॥ '... तसें पाहिलें तर ' जो तुझी संगती धरी । तो सदाचा भीकारी । या लोकीकामाझारी । त्यासी न मानीती ॥ १३ ॥ ' पण माझें महिमान पहा – माझ्यापुढें ज्ञान, ध्यान, साधन, आचार, विचार, वैराग्य, विवेक, परमार्थ, आनंद, बोध, निवृत्ति, भक्ति, क्षमा, दया इत्यादि कोणाचेंच चालत नाहीं. ' मी जगाचें मुळ । मी या यमाचें माहा बळ । वीशयाचे कोल्हाळ । माझेनी जें ॥ २६ ॥ '... ' मी आणी माझें । हें तुम्हापासी नाही सहज । तरी कैचे चालेल वोजे । राज्य या क्षेत्राचें ॥ ३५ ॥ ' तेव्हां तुम्ही राज्याची इच्छा न धरावी हें बरें. ' तुम्ही वसावें येकांती । धरावी अतीताची संगती । जपमाळा घेउनीयां हाती । आजपाजप करावें ॥ ४८ ॥ दढ आसन घालावें । प्रणवपीठीं राहावें । प्राणायाम करावें । सोहंमेळेसी ॥ ४९ ॥ तुम्हां लज्याची नाही । अभीमान नसे तुमचा ठाईं । कुळाचार सर्वहीं । वर्जुनीयां घातला ॥ ५० ॥ ऐसे तुम्ही नीर्गुण । तुम्हां राजा म्हणेल कोण । यालागि सांडा ध्यान । राज्य करावयाचें ॥ ५१ ॥ ' ... " बोधरायानें त्याची स्तुति अव्हेरिली. बोध सहर्ष डोलत होता पण बोलला नाहीं. मोहानें ' मोन ' ( मोहन ? ) शस्त्र जपून मोहकपणें बोधावर सोडलें. बोध त्या शस्त्राकडे पाहात असतांच त्याची ' वाताहत ' होऊन तें ' जेथीचें तेथें वीरालें '. आपलें कांहीं चालणार नाहीं याची मोहाला कल्पना आली. मग त्याला वाटलें, ' आतां एक असे कारण । या बोधासीच रीघीजे शरण । तेणें चुकेल जन्ममरण । यरवी धड न दीसे ॥ ६१ ॥ '. अशा रीतीनें मोह बोधास शरण आला. आणि ' जैत बोधासी आलें । आपुलें राज्य आपणा जाहलें । नगरी धेंडे पीटीलें । स्वराज्य म्हणउनी ॥ ६६ ॥ ' सर्वांना आनंद झाला. विवेक ज्ञानाला म्हणाला, " प्रवृत्तिसुत ' हें सापत्नीक बंधु आमुचें । याचा वधु करु नये साचें । ईहीं वचन प्रतीपाळावें तुमचें । आज्ञाप्रमाण वर्तावें ॥ ७२ ॥ " ज्ञानानें तें मानलें, पण त्यांच्यावर देखरेख करण्यासाठीं विचाराची योजना केली. प्रवृत्ति निवृत्तीची दासी झाली आणि प्रवृत्तीच्या राक्षसी कन्या ' बंदी घातल्या '.

## ' आता मना तुम्ही येक करावें '

नंतर ' ज्ञानेश्वरानें ' मनाला उपदेश केला. "... येथून आतां निवृत्तीची सत्ता सुरू झाली.... आतां तुम्हीं बोधाजवळ ' दढ येकाग्र बैसावें '. इंद्रियांच्या अधीन न व्हावें. संकल्पविकल्पांना दंडावें. प्रवृत्तीसमीप न बसावें. मोहांत गुंतूं नये. काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर यांचा संग न धरावा. ' आशा तृष्णादी ईछा । यांची न धरावी वांछा । आणी नाना वीशयावीशी कांक्षा । ते असो नेदावी ॥ ८६ ॥ '... पट्टाची भाज निवृत्ति तिच्याशीं ' गुज असावें ', त्यामुळें ' ऐक्यापरत्रीचें भोज वाढेल '. भाव निरंतर हृदयीं धरावा. वैराग्य समागमें हिंडवावा. विवेक समीप बसवावा. ' कार्याकार्य ठाईं । वीचार असावा तीये समई । '. परमार्थास जिवावेगळा करूं नये. आनंदास केव्हांहि विसरूं नये. हर्ष कंठी धरावा. धीर सोडूं नये. ' भक्ती शांति क्षमा दया । ह्या आवडतीया कुवंरीया । यासी प्रेम करूनीयां । माहेर करावें ॥ ९५ ॥ धृति स्छीती साजणी । आणी तें वीश्रांती आनंदाची राणी । तीयेसी मंदीरा आणुनी । गौरवावें आदरें ॥ ९६ ॥ तुर्या हें चौथी । उन्मनीची बहीण आवडती । तिसही अती प्रीती । जवळीकें ठेवावें ॥ ९७ ॥ या सकळाचा असो ह्या समागम ।... ' सुख आलीयां न सुखावें । दुखप्राप्ती जाहलींयां न दुखावें । आनंदयुक्त असावें । सदा काळीं ॥ १०० ॥ ... जे जें वेळे जे नीर्मीत । ते अपसयाची येईल टाकीत । ऐसें मनी नीश्रीत । अनुभवें करूनी ॥ २ ॥ यालागी सहजी सहजपणें । सहजची वर्तावें जाण । सहजावेगळें जाण । मानसीं न धरावें ॥ ३ ॥ तरी सहज म्हणसी कैसें । तरी तें सांगतो ऐका सावकाशे । हें पींड ब्रह्मांड अपैसें । चाले सहजेची ॥ ४ ॥ रुतकाळीं संवछर । तीथी वार नक्षत्र । युग आणी मन्मंतर । ते सहजेची चालती ॥ ५ ॥ ... म्हणउनी सहजस्छीती । वर्तावें गा नीश्रीती । कवणावीसी खंती । मानसीं न धरावी ॥ ११ ॥ साहावा भेदाभेद । नीवडावा वीशाद । आणी कवणेवीशी द्वंद । न धरावा मानसी ॥ १२ ॥ जनी असोनी जनपणे । सुखें वर्तावें जाण । परी मनी न धरणें । फळवासना ॥ १३ ॥ आणीक येक मना का ( क ? ) रणें । स्वरूपीं असावें सावधान । तेणें संसारबंधन । न बाधी तुज ॥ १४ ॥ संगती धरी साधुची । शेवा करी गुरूची ।

रुची असो दे नामाची। मुखी सदा सर्वदा ॥ १५॥ नामाचें महीमान। काये मी सांगो अती गहन। नामेकरीतां पावन। जाहले बहुतेक ॥ ११६ ॥'..." (प्र. १२)

**' अैसें नाम अती पावन '**

ज्ञानानें आतां नाममाहात्म्य सांगायला प्रारंभ केला, "नामे गजेंद्र सुटला। नामे अजामेळ उत्धरीला। वैकुंठी सरिता जाहला। तया नामेकरूनी ॥ १॥ द्रोपदी वस्त्राहरणी। नामे सुटली नीर्वाणी। आणी तें गणीका कुंटणी। नामे जाहली पावन ॥ २॥' 'दैत्यवैंसी प्रल्हाद', नारद, गणेश, सरस्वती आणि 'गंधर्वादीक' नामाचें कीर्तन गातात. 'जे नाम उच्चारीती। तयासी कळीकाळ कांपती। येमही येतो काकुलती। नामउचारेंण कत्यासी (कर्त्यासी वा करी त्यासी?) ॥ ६॥ नामे स्वर्गसुखप्राप्ती। नामे लाभती च्यार्‍ही मुक्ती। नामावेगळी गती। जाण नीश्चीती असेना ॥ ७॥ जो कोण्ही करी नामअभ्यासु। तोची दासामाजी दासु। नाम जपे महेशु। तया होउनी आगळा ॥ ८॥ तपदान तीर्थव्रत। जरी केले गा बहुत। परी त्या नामापरतें। आणीक नाहीं साधन ॥ ९॥ ..."

**आणी संताचे संगतीसी। अंतर पडो नेंदावें**

संताचीये संगती। तेणें उपजे भावभक्ती। नीर्मळ होये चीतवृती। तया संगतीपासांव ॥ १२॥

**नववीधा भक्ती आंत। वावरो दें तुझे चीत।**

तेणें तुं पारांगत। सहजेची होसी ॥ १३॥ ... कामे भयें वैरे। साईंयासें धने साचार। अथवा भक्ती नाना साहा प्रकारें। भजन करावें ॥ १५॥ कामे भजलीया गोपीका। भजोनी पावलीया मोक्षसुखा। भयेंकरुनी कौंसादीका ॥ मोक्षसीधी पावलें ॥ १६॥ हिरंण्यकश्यप हीरण्याक्ष। ना ते रावणकुंभकर्णादीक राक्षेस। शुशुपाळादीक वक्रदंत बहुवस। वैरें मोक्ष पावलें ॥ १७॥ सोईरेपणे पांडवा। लाधला मोक्षसुखाचा ठेवा। ममत्वें गौळयादीक वसुदेवा। या समस्तादीका सकळा ॥ १८॥ सन्नीधानें यादवां सकळा। की गोधनें राखता गोपाळा। ना तरी रघुनाथ अवतारी वान्नरकुळा। मोक्ष लाभे संनीधाने ॥ १९॥ शेवा दास्य करीतां। गरुडादि हणुमंता। जे लक्ष्मी मुख्य कांता। शेवा करीतां पारांगत ॥ २०॥ श्रवणें परीक्षीती अर्जुनादीक। पावले मोक्षाचें परमसुख। वंदने अक्रुरादी वीशेख। परम सुख पावलें ॥ २१॥ पाहा पां बळ चक्रवती। दुजा सीभ्र महा सुपती। तें आत्मनिवेदने मोक्षप्राप्ती। सायोज्य गती पावलें ॥ २२॥ कपीलाचार्य मुख्य। आणी शुक तो वीशेख। नातरी वीदेही जनक। ज्ञाने मोक्ष पावले ॥ २३॥ वाल्मीक व्यासदेव। आणीकहीं बहुत मानभाव। कवीत्वें पावलें गौरव। मोक्षसुखाचें ॥ २४॥ जडभरीतादि थोर थोर। आणीकही नव योगेश्वरे। आत्मसुखें पावले पार। मोक्षसुखाचें ॥ २५॥ रुक्मांगद अंबरुसी। व्रतेकरूनी पावले मोक्षासी। हे तवं बहूतांसी। ठाउके आसे ॥ २६॥ पाहा पां तो पारासुर। धृव धाकुटा कुंवर। कवी हरी ईत्यादि योगेश्वर। तपें मोक्षसारांश पावले ॥ २७॥ युधीष्टीर आणी तो नळ। माहाराजे पुण्यसीळ। ते मोक्षसुख पावले केवळ। येक सत्येंकरूनी ॥ २८॥ पाहा पां कर्ण सुर्यकुंवर। दुजा श्रीयाळ सत्वधीर। ते पावलें मोक्षपार। दातृत्वेंकरूनी ॥ २९॥ नारदादी हणुमंत। भीश्म तो जगवीख्यात। स्वामी कार्तीक ईश्वरसुत। सुख पावले ब्रंम्हाचार्यें ॥ ३०॥ पृथु चक्रवती रावो। खटवांग हरीचंद्र माहाबाहो। वीदुर श्रुतदेव मुचकुंदादि सर्व। माहाराजे ॥ ३१॥ आणी थोर थोर रूशीवर। ईतर जना नाही पार। योग अर्चन भजनसार। लाभलें मोक्षाचें ॥ ३२॥ आतां असो हा भक्तीवाद। वर्णीता असे अगाध।..." सारांश, 'मन तवं व्यापक परीयेसी। पर ज्ञानें केलें येकदेशी। भेद दवडुनी अभेदेसी। नीश्चळ राहीलें ॥ ५३॥.'

**' अैसें सामराज्य जाहलें '**

'ऐसी बोधाची राणीव जाहली। मनाची धांव पारूशली। प्रवृतीची क्रीया बुडाली। सता जाहली नीवृतीची ॥ ५४॥ नी:स्कंटक राज्य जाहलें। वैरी ठाईं ठाईं आहाळीलें। तें देखोनी सुख जाहलें। संतजना वीरक्तां ॥ ५५॥ आणी ते बोधाची राणी। पतीवृता हो उन्मनी। सगुण गुणे शाहाणी। बोधा लाहाणी अती पाडे ॥ ५६॥ तुर्या उन्मनीची बहीणी। ते जाणे तया दोघाची खुण। साक्षीत्वें उभी राहुन। पाहे त्या दोघातें ॥ ५७॥ वीश्रांति राणी आनंदाची। तेही असे तेथेची। तया दोघांची प्रीतीची। गोडी











अनुक्रमणिका

तीयेलागी ॥ ५८ ॥ आनंदासहीत तयाजवळी । असे पैं सदा काळीं । वर्तंत असे पैं सदा सहमेळी । हर्शासमवेत ॥ ५९ ॥ आनंदा वीश्रांती करीतां । बोध जाहला शोभता । आणी मन ही पीता । तेथची दढावला ॥ ६० ॥ ऐसा बोध तो बोधला । साक्षत्वें आपणची जाहला । नामरुपाचा ठेला । भेद तेथें ॥ ६१ ॥ पुर्या आष्टकाचें खंडण । जाहलें तुटलें बंधन । तीनी गुण वीरोन । येक जाहले ॥६२॥ द्रस्टा दश्य दशा दरुशण । ज्ञाता ज्ञेय ज्ञान । ध्याता ध्येय ध्यान । त्रीपुटी जाण वीराली ॥ ६३ ॥ भोग्य भोग भोक्ता । कार्य कारण कर्ता । तेही साक्षत्वें पाहतां । आपणची जो ॥ ६४ ॥ ऐसा बोध सगुण । प्रणवपीठीची लाधला खुण । वोंमीत्येकाक्षर ब्रंह्म जाण । आपणची जाहला ॥ ६५ ॥ अक्षर तेंची क्षरले । क्षर तेंची आक्षर जाहलें । या परतें काहि नाही उरलें । राज्य संचलें स्वरूपें ॥ ६६ ॥ राजमुद्रा ॐकार भारी । आसे सकळाचा सीरावरी । हे तरी साच चराचरी । संतजना ठाउकें ॥ ६७ ॥ ऐसें सामराज्य जाहलें देख । सरला भेदाचा आवांका । तेणें सुख जाहले सुखा । प्रेमी प्रेम मीळालें ॥ ६८ ॥ ' (प्र. १३).*

* प्रस्तुतची हस्तलिखित पोथी संकेश्वर येथील माझे एक गुरुतुल्य हितचिंतक श्री. बाबुराव उर्फ धोंडो दशरथ शांत यांच्याकडून मला मिळाली. आपल्याकडील मराठी हस्तलिखित ग्रंथांचा सारा संग्रह मोठ्या प्रेमानें आणि विश्वासानें त्यांनीं माझ्या स्वाधीन केला. माझी कृतज्ञता शब्दांनीं व्यक्त करणें अशक्य आहे.

मराठींतील या एका उत्कृष्ट ग्रंथाची संपूर्ण ओळख पुस्तकरूपानें करून देण्याची मनीषा बाळगून आहे. पण त्यासाठीं सदर ग्रंथाच्या आणखी कांहीं हस्तलिखित प्रतींची प्राप्ति होणें आवश्यक आहे. अजूनहि ठिकठिकाणीं खाजगी संग्रहांत मराठी हस्तलिखितें पडून आहेत. तीं प्रकाशांत आणणें आपलें कर्तव्य आहे. या कामीं प्रती मिळवून देऊन कोणी मला साहाय्य केल्यास त्यांचा मी ऋणी राहीन.

---














प्रा. सदाशिव आठवले

# पारतंत्र्यं बंधः; स्वातंत्र्यं मोक्षः ।

[चार्वाक दर्शनावरील चौथा लेखांक. ह्यांत चार्वाकांचा मोक्षविषयक दृष्टिकोन स्पष्ट केला आहे. लेखक]

मानवी जीवन धडपडत असतें. कुठें पांच रुपये पगारवाढ व्हावी म्हणून, कुठें थोडेसें नांव व्हावें म्हणून, कुठें आहे त्याहून चांगली जागा राहायला मिळावी म्हणून, कुठें एखादी कोमलांगी प्राप्त व्हावी म्हणून; आणि ह्याचबरोबर कधीं एखादें ऐतिहासिक किंवा शास्त्रीय सत्य समजावें म्हणून तर कधीं जग सुधारावें–आपल्या डोळ्यांदेखत किंवा आपल्या नंतरहि–म्हणून लहान मोठ्या अनेक गोष्टींसाठीं, कशाना कशासाठीं अखंड प्रयत्न चाललेला दिसतो. माणूस कांहींतरी शोधीत असतो, कांहींतरी हुडकीत असतो. त्याला काय हवें असतें ? तत्त्वज्ञ हें जें हवें आहे ह्याला अनेक नावें देतात. कुणी सुख म्हणतात, कुणी समाधान म्हणतात, कुणी शांति म्हणतात; कुणी चिरशांति म्हणतात. "एकं सद् विप्राः बहुधा वदन्ति" ! कांहीं तत्त्वज्ञ केवळ ह्या धडपडीला योग्य नांव शोधून थांबायला तयार नसतात. त्याहून मोठी जबाबदारी आपल्या लहानग्या शिरावर घेऊन ते म्हणतात कीं माणूस आपल्याला जें हवें आहे असें म्हणतो तें त्याला हवें असतेंच असें नाहीं, किंवा तें त्याला हवें असलें तरी तें त्याच्या अंतिम हिताचें असतें असेंहि नाहीं. तेव्हां मानवी जीवनाची इतिकर्तव्यता काय ती आम्ही सांगतो. त्यानें जीवनांत कोणत्या गोष्टी डोळ्यापुढें ठेवाव्या हें सांगण्याचा अधिकार आमचा, पुरुषार्थाची व्याख्या आम्ही करणार-आणि आम्हीच करणार असा दावा प्राचीन कालापासून आजपर्यंत अनेक तथाकथित तत्त्वज्ञानी मांडीत आले आहेत, आणि त्यांतील कित्येक मानवी जीवनाचा अर्थ लावतांना आणि व्यक्तिमात्राला मार्गदर्शन करतांना इतके चुकले आहेत, घसरले आहेत, भांबावले आहेत, गडबडले-गोंधळले आहेत आणि असंबद्ध बोलते झाले आहेत–तो सगळा शब्दांचा फापटपसारा पाहून त्याची कींवच करावी ! अर्थात कांहीं शहाणे तत्त्वज्ञानीहि होऊन गेले आहेत.

## जीवनाचें एकमेव लक्ष्य : मोक्ष

प्राचीन भारतीय तत्त्वज्ञान्यांनींहि मानवी जीवनाचा आणि जीवनध्येयांचा विचार केला; भरपूर वाद केले; कसून चिकित्सा झाली आणि त्यांना धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष असे चार पुरुषार्थ दिसले. तथापि सर्व वैदिक, बौद्ध आणि जैन विचारवंतांना, दार्शनिकांना, शास्त्रीय विषयांवर लिहिणारांना आणि ललित लेखकांना, कवींना सुद्धां मोक्ष हा परमपुरुषार्थ वाटतो. सर्व रस्ते मोक्षनगरीलाच जातात. लोकायत (चार्वाक) सोडून जैन, मीमांसकादि सर्व लोक आपापल्या मार्गांनीं परंतु त्याच दिशेनें चालत असतात[1] आतां हें जें परमोच्च ध्येय मोक्ष– तें आहे

---

१ अस्त्यत्र निर्वृतिर्लोके नगरी सुमनोहरा ।
सा च मुक्तेरतिक्रान्ता महामोहादिभूभुजाम् ॥
निर्द्वन्द्वानन्दसंपूर्णा सततं निरुपद्रवा ।
एभिश्चाकर्णिता सर्वैः सा लोकैः पुरवासिभिः ॥
ततो लोकायतं मुक्त्वा ये शेषपुरवासिनः ।
नगरीं गन्तुमिच्छन्ति तामेते वत्स निर्वृतिम् ॥



अनुक्रमणिका








तरी काय ? ती एक अवस्था आहे. पण अवस्था म्हणजे शरीराची ? मनाची ? कां आत्म्याची ? त्या अवस्थेच्या स्वरूपाविषयींहि अनेक मतें आहेत. नैयायिक, वैशेषिक, सांख्य वगैरे म्हणतील कीं दुःखाचा लवलेश नाहीं, आत्यंतिक दुःख-निवृत्ति म्हणजे मोक्ष; तर मीमांसक, वेदांती, जैन वगैरेंना त्यांना सुखसिद्धीहि दिसेल-आनंदमयता दिसेल. त्या अवस्थेचीं अशी भिन्नभिन्न, कळण्या-सारखीं, न कळण्यासारखीं; पटण्यासारखीं, न पटण्यासारखीं अशीं नानाविध वर्णनें असलीं तरी जीवनाचें एक परमध्येय आहे, निःश्रेयस आहे, कांहीतरी एक मिळविण्यासारखी मोठी गोष्ट आहे, त्याहून कमी ध्येय असून चालणार नाहीं आणि त्याहून जास्त मिळविण्यासारखें कांहीं रहात नाहीं हा सूर सर्वांचाच आहे. तें जें एकमेव लक्ष्य त्याला म्हणायचें मोक्ष.

मोक्ष किंवा मुक्ति ह्या प्रकाराच्या मुळाशीं दोन कल्पना आहेत. एक म्हणजे ह्या जन्मींच्या दुःखा-पासून मुक्ति आणि दुसरी म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यांपासून मुक्ति. पैकीं पुनर्जन्मापासून मुक्ति हा भाग केवळ उल्लेखून सोडून देणें बरें. सर्व मोक्ष-वाद्यांचा पुनर्जन्मावर विश्वास होता. ह्या पुन-र्जन्माच्या सिद्धांताची अशास्त्रीयता बाजूला ठेवली तरी मोक्षवाद्यांना जन्माचे फेरे नकोत, पुन्हां जन्म नको ह्याचा अर्थ त्यांना जन्माला येणें आणि जगणें म्हणजेच दुःख असें वाटत होतें हें स्पष्ट आहे. कुठल्याहि जन्मांत दुःख असतें हा सिद्धांत अर्थात् त्यांनी ह्या जन्माच्या अनुभवावरच आधा-रला. आतां हा जन्म आलाच आहे तो जगला पाहिजे पण कसें जगायचें ? पुढचे जन्म चुक-विण्यासाठीं जें कांहीं करायला पाहिजे तें करीत जगायचें. हाच या जन्माचा उपयोग. हाच नर-जन्माचा अर्थ. ह्या जन्माला अन्य कर्तव्य नाहीं.

## मोक्षाचा भोंगळ मार्ग

आतां पुढचा प्रश्न. हा मोक्ष कसा मिळेल ? ह्याला थोड्याबहुत फरकानें निरनिराळीं उत्तरें दिलीं गेलीं आहेत. परंतु सर्व उत्तरांत सामान्य मुद्दा असा आहे कीं, माणूस अज्ञानामुळें जन्म-मरणाच्या फेऱ्यांत सांपडतो. चौऱ्यांशी लक्ष योनि चुकविण्याचा आणि ती निरुपम आनंदाची किंवा आत्यंतिक दुःखनिवृत्तीची स्थिति प्राप्त करून घेण्याचा उपाय म्हणजे ज्ञान. योग्य तें ज्ञान. सम्यक् ज्ञान. अविद्या हें बंधन; विद्या हा मोक्ष.

तेव्हां (अ) हा जन्म दुःखमय आहे.

(आ) पुढें अनेक जन्म आहेत आणि तेहि असेच दुःखमय आहेत.

(इ) हीं सर्वजन्मींचीं सर्व दुःखें एक-दांचीं संपविलीं पाहिजेत.

(ई) दुःखें संपविण्याचा उपाय आहे आणि तो ह्या जन्मीं करतां येण्यासारखा आहे.

(उ) त्या उपायाचें ज्ञान ही विद्या, तो उपाय माहीत नसणें ही अविद्या.

(ऊ) त्या विद्येच्या आश्रयानें जगून माणसानें जीवनाचें सार्थक करावें.

अशा क्रमानें प्राचीन भारतीयांनीं जीवन-तत्त्वज्ञान सांगितलें. आणि हें तत्त्वज्ञान चुकीच्या कल्पनां-वर आधारलेलें, फसवें, भोंगळ, तर्कदुष्ट आणि अप्रामाणिक असून जीवनाकडे अगदीं निराळ्या दृष्टीनें पहातां येईल असें ठासून सांगणारा एक पंथहि प्राचीन भारतांत होता, तो चार्वाक पंथ.

---

एते च सर्वे तां गन्तुमन्तरङ्गैर्महापथैः ।
स्वकल्पितैः प्रवाञ्छन्ति परस्परविरोधिभिः ॥

– उपमितिभाव प्रपंचकथा– ( चतुर्थ प्रस्ताव, पृ. ६६३ )

### ह्याच जन्मांतील सुख

आतां ह्या चार्वाकपंथीयांचें ह्या मोक्षकल्पनेवरील भाष्य पहावयाचें. असंख्य जन्मांच्या फेऱ्यांतून चार्वाकांनीं आपणांस प्रथमच सोडवून घेतलें आहे. त्यांच्या प्रत्यक्षप्रमाणावर आणि प्रत्यक्षनिष्ठ अनुमानांवर आधारलेल्या तर्कशास्त्रांत पूर्वजन्म आणि पुनर्जन्म बसत नाहींत.[२]

मग जो विचार करावयाचा तो ह्या जन्मापुरताच. ह्या जन्मासंबंधीं बोलतांना कुणी म्हणतात कीं सर्व दुःखच दुःख,[३] तर कुणी म्हणतील कीं जीवनांत सुखदुःखं दोन्हीं दिसत असलीं तरी माणसाला दुःखाचा क्लेश जेवढ्या तीव्रतेनें जाणवतो तेवढ्या उत्कटतेनें सुखाचा अनुभव घेतां येत नाहीं. क्वचित् कोठें तरी, कोणी तरी किंचित् सुखी दिसतो; पण एकूण दुःखाचें प्रमाण फारच भयंकर आहे.[४] "सर्वे दुःखं दुःखम् ।" हें तर बौद्धांचें पहिलें आर्यसत्य. जैनांचाहि सूर तोच. चार्वाक म्हणतात : हा दृष्टिकोन बरोबर नाहीं. जीवित केवळ दुःखमय नाहीं, तें सुखदुःख मिश्रित आहे. जीवनांत दुःखें भोगावीं लागतात हें नाकारून चालणार नाहीं पण दुःखं टाळतां येतात, कमी करतां येतात. दुःखाचीं कारणें नाहींशीं करून ह्या जीवतांतच, इथून निवृत्त न होतां माणसाला सुखी होतां येईल, सुखाचा उत्कटतेनें अनुभव घेतां येईल, इथें स्वर्ग निर्माण करतां येईल असा सिद्धांत चार्वाकानुयायी मांडतात. अंतीं सगळ दुःखच आहे असें मानून सुखांचा त्याग करण्याचा सल्ला हा धादांत मूर्खपणाच आहे अशी चार्वाकीय स्पष्टोक्ति आहे. आतां दुःखं कमी करून जास्तींत जास्त सुख कसें मिळवायचें ही माणसाच्या कौशल्याची, शहाणपणाची आणि विवेकशीलतेची बाब आहे. हा मुद्दा चार्वाक कांहीं उदाहरणें देऊन स्पष्ट करतात. साळीवरचा तूस काढून आंतला तांदूळ खायचा असतो. कांटा काढून मासा खावा. भिक्षेकऱ्यांना चुकवून सुग्रास भक्षावा; परंतु तुसाचें आवरण आहे म्हणून तांदूळ त्याज्य, कांटा आहे म्हणून मासाच वाईट किंवा भीकमागे येतील म्हणून अन्नच शिजवायचें नाहीं हा निव्वळ अडाणीपणा नव्हे तर काय ?

---

२ चार्वाकदर्शनावरील प्रस्तुत लेखकाचा दुसरा लेखांक.

३ परिणामतापसंस्कारदुःखैर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः । योगसूत्र २।१५ पृ. १६७
—पातञ्जलदर्शनम्--संपादक, जीवानन्द विद्यासागर भट्टाचार्य—कलकत्ता १८९७

४ अत्यन्त दुःखनिवृत्त्या कृतकृत्यता । ६।५
यथा दुःखात् क्लेशः पुरुषस्य न तथा सुखादभिलाषः । ६।६
कुत्रापि कोऽपि सुखीति । ६।७
—सांख्यसूत्रें.

५ त्याज्यं सुखं विषयसंगमजन्मपुंसाम् ।
दुःखोपसृष्टमिति मूर्ख विचारणैषा ।
व्रीहीञ्जिहासति सितोत्तमतण्डुलाढयान् ।
को नाम भोस्तुषकणोपहितान्हितार्थी ॥
— प्रबोधचंद्रोदय, अंक ४।२२;
—नैषधचरित् १७।४८; १७।७० ते ७५;
—सर्वदर्शनसंग्रह;—चार्वाकदर्शनम् ।
—सर्वसिद्धांतसंग्रह — लौकायतिकप्रकरणम् ।











अनुक्रमणिका

सर्व स्त्रीपुरुष कामोपभोग घेतात. त्यांनीं घ्यावेहि. हा सरळ जीवनमार्ग सोडून अपवर्गाचें तत्त्वज्ञान सांगणारे आणि तें ऐकणारेहि स्त्री किंवा पुरुष नसून तृतीयलिंगीच असले पाहिजेत अशी कदाचित् थोडीशी चावट पण अत्यंत रास्त अशी टीका चार्वाक करतात[६]. मनुष्यमात्रानें अंतीं ज्यानें सुख-प्राप्ति होईल अशाच गोष्टी आयुष्यांत कराव्या[७].

## जीवनाचें वास्तव दर्शन

चार्वाकेतर दर्शनकार म्हणतील कीं आम्हीहि हेंच म्हणतो : अंतीं सुख, शांति, चिरशांति लाभेल अशा तऱ्हेनें जीवन जगावयाचें. ठीक आहे. चार्वाक आणि चार्वाकेतर ह्यांचें ह्या मुद्यावर एकमत आहे असें क्षणभर मानलें तरी पुढचा मुद्दा असा कीं, ही अंतिम सुखशांति मिळविण्यासाठीं काय करावयाचें ? ह्या प्रश्नाचें चार्वाकांचें उत्तर चार्वाकेतरांपेक्षां अत्यंत भिन्न आहे. मीमांसकांच्या मतें प्रपंचाशीं आपले संबंध तोडणें हा मोक्षोपाय[८]. सांख्ययोगा-नुयायांचें म्हणणेंहि असेंच. हा संसार दुःखांनीं भर-लेला आहे आणि त्यापासून आत्यंतिक निवृत्ति हाच मोक्ष[९]. इहलोकीचा अभिलाष हा निर्वाण-स्थितीस, सर्वश्रेष्ठ मोक्षप्राप्तीस मारक आहे. सर्व लहानमोठ्या आसक्ति सोडून जो वीतराग होईल तोच संसार तरून जाईल असें जैन सांगतात[१०]. बौद्धां-नाहि वार्धक्य, मृत्यु, पुनर्जन्म वगैरेंपासून कायमची सुटका पाहिजे आणि त्यासाठीं जगताचा शरीराचा मोह सुटला पाहिजे असा त्यांचाहि आग्रह आहे[११].

---

६ उभयी प्रकृतिः कामे सज्जेदिति मुनेर्मनः ।
अपवर्गे तृतीयेति भणतः पाणिनेरपि ॥ नैषधचरितम् १७।७०

७ सुकृते वा कथं श्रद्धा सुरते च कथं न सा ।
तत्कर्म पुरुषः कुर्य्यात् येनान्ते सुखमेधते ॥ कित्ता १७।४८

८ प्रपंचसंबंधविलयो मोक्षः । – शास्त्रदीपिका.

९ व्यासभाष्य आणि विज्ञानभिक्षुवार्तिक पृष्ठें १६९-७०; १७७;२३०
– पातञ्जलदर्शनम् – संपादक भट्टाचार्य, कलकत्ता १८९७

१० संसारिणःपुरुषस्य सर्वेष्वर्थेषु मोक्षः प्रधानम् ।
– तत्त्वार्थवार्तिकम् ( राजवार्तिक )
– भट्टाकलङ्कदेव ( – काशी १९४४ )
तह्मा णिव्वुदिकामो रागं सवत्थ कुणदि मा किंचि ।
सो तेण वीदरागो भविओ भवसायरं तरदि ॥ १७६
– श्रीपञ्चास्तिकायसमयसार
– कुन्दनकुन्दाचार्य
संपादक – चक्रवर्तिनायनार ( १९२० )

११ सुमुत्ता साधु मुत्त म्हि तीहि खुज्जेहि मुत्तिया
उदुक्खलेन मुसलेन पतिता खुज्जकेन च ।
मुत्त म्हि जातिमरणा भवनेत्तिसमूहता । – थेरीगाथा ११
कम्मं यथा न भवतीह च मोहनासा
कम्मक्खया पि च न होति भवेसु जाति



अनुक्रमणिका







त्यासाठीं त्यांनीं ऐहिकाची तोंडभर निंदा केली आहे; शरीराचें घृणास्पद वर्णन केलें आहे[१२]

वैदिक आणि जैन-बौद्ध तत्त्वज्ञांचा मानवजातीला संसारापासून विरक्त होत जाऊन भलतीकडे कुठेंतरी पहात बसण्याचा हा उपदेश अत्यंत अनैसर्गिक जीवनपद्धति सांगणारा आहे. एकंदर भारतीय लोक प्रत्यक्षांत तसे जगले नाहींत हाच त्याच्या अनैसर्गिकतेचा सर्वांत मोठा पुरावा. राज्यें स्थापन झालीं, साम्राज्यें वाढलीं; काव्यें रचिली गेलीं. गाइली गेलीं. संगीतनृत्यादि कला बहरल्या, वैद्यक कामशास्त्रांचा अभ्यास झाला, देवळें, धर्मशाळा, तलाव बांधले गेले— हें सगळें काय प्राचीन भारत निवृत्ति मार्गानें गेल्याचें दाखवितें कीं काय ? डोळ्यासमोर मोक्ष ठेवून लोक जगले नाहींत. एवढेंच नव्हे तर सर्वसामान्यांच्या मनांत मोक्ष म्हणजे आपली कथापुराणांत ऐकावयाची गोष्ट असेंच होतें. प्रिय माणूस निवर्तल्यावर जेव्हां एकप्रकारचें वैराग्य येतें तेव्हां मोक्षकथा ऐकून सांत्वन झाल्यासारखें वाटतें एवढाच फार तर त्याचा व्यावहारिक उपयोग.[१३] परंतु दैनंदिन जीवनांत मोक्षकथा ह्या कानानें ऐकून त्या कानानें सोडून द्यावयाची असते आणि आपापल्या घरांत सुखासमाधानानें राहावयाचें असतें हीच सर्वसाधारण माणसाची वृत्ति असते.[१४] हीं सत्यें जयंतानें स्पष्ट सांगून ठेवलीं आहेत. ह्याच सर्वसामान्यांच्या स्वाभाविक जीवनाचें वास्तव दर्शन चार्वाक घडवितात. नैसर्गिक आणि मानवनिर्मित कारणांनीं जगांत अनेक प्रकारचीं दुःखें भोगावीं लागतात. जमेल तेवढें प्रयत्नांनीं दुःख टाळलें पाहिजे. अटळच असतील तीं गिळलीं पाहिजेत. परंतु दुःखमयता हाच मुळीं जीवनाचा अर्थ सांगून जनतेस मोक्षाचा रस्ता दाखविणें हा भ्याडपणा, मूर्खपणा, भोंदूपणा आणि मतलबीपणा आहे अशी चार्वाक इतरांवर टीका करतात. ही टीका त्यांनीं अतिशय धैर्यानें आपल्या भूमिकेशीं सतत प्रामाणिक राहून केलेली दिसते. मात्र चार्वाकीय विचारसरणी प्रत्यक्षांत अनुसरणाऱ्या आणि कामशास्त्रावर ग्रंथ लिहिणाऱ्या वात्स्यायनासारख्या ग्रंथकारानें सुद्धां हें धैर्य दाखविलें नाहीं. वात्स्यायनानें धर्म, अर्थ, काम हे तीनच पुरुषार्थ सांगितले. मोक्ष हा चौथा पुरुषार्थ सांगितला नाहीं.[१५] पण धर्म हा पुरुषार्थ सांगतांना धर्म न मानणाऱ्या चार्वाकांवर तो आणि त्याचे टीकाकार घसरलेच. चार्वाकांना— लोकायतिकांना—समाजस्वास्थ्य नको आहे किंवा कसें

---

जातिक्खया इह जरामरणादि दुक्खं
सब्बक्खयं भवति दीप इवानिलेन ।। ६२ ।।
— तेलकटाहगाथा ( काशी १९४८ )

१२ उदान; इतिवुत्तक, मिलिंदपन्ह; तेलकटाहगाथा इत्यादि.

१३ साध्यस्त्रिवर्ग एवैष धर्मकामार्थलक्षणः ।
चतुर्थः पुरुषार्थस्तु कथास्वेव विराजते ॥
यदा प्रियवियोगादि भवत्युद्वेगकारणम् ।
तदा मोक्षकथाः कामं क्रियन्तां शोकशान्तये ॥
न्यायमंजरी पृ. ८२ ( चौखंबा १९३४ )

१४ अशक्येऽर्थे वृथाऽऽयासं परित्यज्य मनस्विभिः ।
मोक्षचर्चाः परित्यज्य स्वे गृहे सुखमास्यताम् ॥ कित्ता पृ. ८४

१५ कामशास्त्र—अध्याय १ ला.










राहील हें कळत नाहीं असें त्यांनीं भासविलें आहे.[१६] वास्तविक चार्वाकांना धर्म नको होता म्हणजे कोणतींच बंधनें नको होतीं असें नाहीं. त्यांना कर्मकाण्डाधिष्ठित वर्णाश्रमरूप धर्म नको होता.[१७] तथापि वात्स्यायनादि कामशास्त्रवेत्त्यांनीं मोक्ष हा पुरुषार्थ नाकारला आणि काम हा परम पुरुषार्थ धर्मापेक्षां श्रेष्ठ–मानला हें कांहीं थोडेथोडकें नाहीं. ह्या खेरीज भागवत पुराणांतहि त्रैवर्णिकांचा म्हणजे धर्म, अर्थ, काम हे तीनच पुरुषार्थ मानणारांचा उल्लेख मिळतो.[१८] ह्यावरून आणि मागें नमूद केलेल्या जयंतानें वर्णिलेल्या सामान्य माणसाच्या वृत्तीवरूनहि[१९] चार्वाकांची मोक्षकल्पनेवरील टीका किती वास्तव होती आणि हळूहळू कशी परिणामकारक होत होती हें स्पष्ट दिसतें.

### चार्वाकाचें सम्यग्ज्ञान

चार्वाकेतर तत्त्वज्ञानी म्हणतात: दु:खाचें कारण अज्ञान किंवा अविद्या; सुखाचें साधन ज्ञान किंवा विद्या. ह्यावर चार्वाक म्हणतील: ठीक आहे. आम्हीहि तेंच म्हणतो. तुमचा जीवित दु:खमय आहे हा सिद्धांतच आम्ही अज्ञान किंवा अविद्या मानतों. तो प्रत्यक्षविरुद्ध आहे, अनुभवाला न पटणारा आहे. दु:खें आहेत पण तीं शक्य तेवढीं टाळा आणि अगदीं टाळतां येणारच नाहींत तीं गिळा किंवा सोसा असा आम्ही उपदेश करूं. एकदां ही वस्तुस्थिति आहे असें लक्षांत आलें, हें नीट मनावर बिंबलें कीं मन स्थिर होईल; ह्या विवेकशीलतेनें मन:शांति लाभेल आणि सुखदु:खासंबंधीं योग्य ती वृत्ति तयार होईल. म्हणजे सुखदु:खं दोन्हीं सारखींच मानण्याची किंवा दोहोंकडे उदासीनतेनें, तुच्छतेनें पहाण्याची वृत्ति नव्हे तर सुख भोगण्याची आणि दु:ख मनाला लावून न घेण्याची वृत्ति, हें चार्वाकीय सम्यग्ज्ञान आहे. म्हणूनच चार्वाकांनीं सांगितलें आहे कीं सबंध आयुष्याचा विचार करतां माणसानें जें सुख मिळवायचें तें मुख्यत: प्रवृत्तिपरतेनें हें खरेंच; पण कधीं कधीं कांहीं काळ निवृत्तिमार्गहि आचरावा लागेल. परिस्थिति–प्रसंगानुरूप, पुढच्या सुखावर लक्ष ठेवून तात्कालिक सुखांचा त्यागहि करावा लागेल. म्हणजे चार्वाक उच्छृंखल, अविवेकी, क्षणिक सुखवाद सांगत नाहींत. आयुष्याचें गणित मांडून विचारपूर्वक, योजनापूर्वक प्रवृत्तिमय जीवन जगायला ते सांगतात. हीच जीवनविद्या. अवघें मोक्ष शास्त्र ती अविद्या.[२०]

### स्वातंत्र्य हाच मोक्ष

मोक्ष ही कल्पना ज्या तऱ्हेनें चार्वाकेतर तत्त्वचिंतकांना अभिप्रेत होती त्या स्वरूपांत चार्वाकांनीं ती कधींच मानली नाहीं हें पाहिलें. परंतु मोक्ष ह्या संस्कृत भाषेंतील शब्दाचा उपयोग करायला चार्वाकांची हरकत नव्हती. तेव्हां मोठ्यांत मोठें ईप्सित असें कांहीं तरी माणसाच्या जीवनांत असूं शकतें हें चार्वाकांनाहि मान्य आहे. पण तें उच्चतम ध्येय

---

१६ किंत्ता १।२।३१ व त्यावरील जयमंगला टीका.

१७ 'ऋणं कृत्वा घृतं पिबेत्' हा प्रस्तुत लेखकाचा चार्वाकदर्शनावरील पहिला लेखांक
— नवभारत, एप्रिल, १९५७

१८ भागवत ८।१८

१९ न्यायमंजरी पृ. ८२

२० लोकायतै: सा निवृत्तिनगरी नास्ति इति प्रख्यापितं लोकायते। ... प्रवृत्तिनिवृत्तिसाध्याप्रीतिः पुरुषार्थ:। स च काम एव नान्यो मोक्षादि.
— उपमितिभावप्रपंचकथा पृ. ६६८.



अनुक्रमणिका






म्हणजे पुनर्जन्मापासून मुक्ति वगैरे हें त्यांना मान्य नाहीं. त्यांच्या मतें स्वातंत्र्य हाच मोक्ष आणि पारतंत्र्य हेंच बंधन.[21] कुठल्याहि प्रकारची परतंत्रता हें बंधन आणि माणसाला आपल्या इच्छा आकांक्षांच्या अनुरोधानें आपल्या मतानुसार जगण्याची परिस्थिति हें स्वातंत्र्य, ही अत्युच्च सुखावस्था, हाच परमानंद, हेंच उच्चतम ध्येय, हाच 'मोक्ष'. मोक्षाचा ऐहिक जीवनाशीं आणि केवळ ऐहिक जीवनाशींच संबंधित असा हा अर्थ चार्वाकांनीं दिला आहे.

पाश्चिमात्य टीकाकार म्हणतात कीं, प्राचीन भारतीयांना जी मुक्ति अभिप्रेत होती तिचें स्वरूप आध्यात्मिक होतें. स्वातंत्र्य म्हणजे राजकीय स्वातंत्र्य, सामाजिक स्वातंत्र्य, व्यक्तीचें आचार आणि विचार स्वातंत्र्य हे जे स्वातंत्र्याचे अर्थ आहेत ते अधिक प्रगत अशा पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचे. हा भारतीय तत्त्वज्ञानाचा भाग नव्हे.[22] ही टीका सर्वसाधारणपणें बरोबरच आहे. सर्व ब्राह्मण, बौद्ध आणि जैन विचारवंतांचे बाबतींत खरी आहे. तथापि केवळ ऐहिक दृष्टिकोनांतून जीवनाचा अर्थ सांगणारे चार्वाक "पारतंत्र्यं बंधः, स्वातंत्र्यं मोक्षः।" अशी—आजच्या पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाच्या अर्थानेंच—स्वातंत्र्याची महती कित्येक शतकांपूर्वी गर्जून सांगून गेले ह्याची नोंद इतिहासांत झाली पाहिजे.

## गांव–पक्ष बनवा

तुम्ही लोक गांवाचें एक कुटुंब करा आणि प्रेमानें रहा. हीच गोष्ट समजविण्यासाठीं मी गांवोगांव फिरत आहे. इकडे आम्ही अशा प्रकारें ऐक्य करण्याचा प्रयत्न करीत आहोंत तर तिकडे लोक वेगवेगळ्या पार्ट्या–पक्ष--बनवून देशाला तोडीत आहेत. एक काँग्रेस पक्ष आहे, एक समाजवादी पक्ष आहे, एक कम्युनिस्ट पक्ष आहे, तर एक जनसंघ आहे. प्रत्येकजण एकमेकांच्या विरुद्ध बोलतो. अशाप्रकारें वेगवेगळ्या पक्षाचे हे लोक कामाचा नाश करतात.

हिंदुस्थानांत हे जे पक्ष बनले आहेत, ते जातिभेदापेक्षां कमी भयंकर नाहींत. म्हणून, तुमच्याकडे हे पार्टीवाले आले तर त्यांना सरळ सांगा कीं, तुमचे हे पक्ष तुम्हीं शहरांतच ठेवा. आम्हांला त्यांची मुळींच गरज नाहीं. आमच्या गांवांतहि आमचा एक पक्ष आहे. त्याचें नांव आहे 'गांव-पक्ष'. तेवढाच आम्हांला पुरे.

— **विनोबा**

२१ "पारतंत्र्यं बंधः; स्वातंत्र्यं मोक्षः" सर्वदर्शनसंग्रह-अक्षपाददर्शन

२२ "The freedom in which the Indian glorified was spiritual ... the state of emancipation, as a concious assurance belongs none the less to that more evolved and positive side of its psychology which in the west, is usually associated with political autonomy and social or personal self-congratulation."

*Moksha – Encyclopaedia of Religion and Ethics*

प्रा. हेमलता आचार्य

# आदिवासी समाज आणि ग्रामदान

## आदिवासी समाज

ग्रामदान चळवळीच्या अंतरंगात शिरून तिच्या भविष्यकालीन उपयुक्ततेचा ठाव घेण्याचा हा एक प्रयत्न आहे. आजपर्यंत जें कांहीं साध्य झालें, त्याचा विचार करून काय करतां येईल यासंबंधीचा हा एक अंदाज आहे. त्यालाहि मर्यादा आहेत. आदिवासी जीवनाच्या संदर्भांतच ग्रामदानाचा प्रश्न येथें हाताळला आहे. अर्थात् असें करण्यास सबळ कारणें नाहींत असें मात्र नाहीं. आजपर्यंत जें कांहीं विशेष झालें असेल तें कोरापुटमध्यें झालें आहे. कोरापुट हा ग्रामदानी चळवळीचा गाभा आहे आणि कोरापुट आणि आदिवासी जीवन यांचाहि निकटचा संबंध आहे.

कोरापुट आणि महाराष्ट्र या दोन्ही ठिकाणचे आदिवासी प्रामुख्यानें प्राथमिक शेती करतात. नाशिक जिल्ह्यांतील कळवण तालुका वर्गीकृत विभागांत मोडतो. आणि तेथील बहुसंख्य लोक आदिवासी आहेत. डांगी गांव लहान आकाराचीं व विखुरलेलीं आहेत. जमीन मालकीच्याच पायावर कसतात. खुद्द आदिवासी लोकसंख्याहि भिन्न भिन्न उद्योग करणाऱ्या विविध उपसमाजांची मिळून बनली आहे. डांगची वनसंपत्ति अत्यंत बहुमोल असून अजूनहि आपणांस तिचा पूर्ण ठाव घ्यावयाचा आहे. अशा ठिकाणी नवीन साधनसंपत्तीचा शोध लावून किंवा उपलब्ध असलेल्या साधनसंपत्तीची नवी मांडणी करून आपल्यापुढील भांडवलसंचयाचा बिकट प्रश्न कदाचित् सोडवितां येईल.

आदिवासी समाज आणि बहुसंख्य शेतकरी समाज यांच्यापुढील परिस्थिति व समस्यांत बऱ्याच बाबतींत साम्य आढळून येईल. पण त्याबरोबरच आदिवासीयांच्या प्रश्नांचीं वैशिष्ट्यें डोळ्याआड करून चालणार नाहींत. समाजविकासाच्या प्रवाहापासून आदिवासी जीवन कित्यक शतकें अलग पडल्याकारणानें हे प्रश्न आणि हीं वैशिष्ट्यें निर्माण झालीं आहेत.

## कोरापुटमधील आदिवासी जीवन

दक्षिणपूर्व कोरापुटमध्यें सुमारें ४३००० बडावा (Godabas) लोक आहेत. शेतमजुरी, शिकार किंवा अन्न गोळा करणें हे त्यांचे प्रमुख व्यवसाय आहेत. कांहींजण रानभाजणी करून शेती करतात. कारेंगो नांवाच्या घायपातापासून वस्त्रें विणण्याचा धंदा तर त्यांच्या समाजजीवनाशीं इतका एकवटला आहे कीं असें विणकाम साध्य झाल्याखेरीज कोणत्याहि बडाव्या मुलीचें लग्नसुद्धां होत नाहीं. लांकडी कोरीवकामाबद्दल प्रसिद्ध असलेले खोंडहि या भागांतलेच ! ५२००० सावरा (Savaras) लोकहि तेथें आहेत. आपल्या सततोद्योगाच्या आणि चातुर्याच्या बळावर पाण्याच्या दुर्भिक्ष्यावर मात करून ते नाठाळ जमिनीमधूनहि भातशेतीचें चांगलें पीक घेतात.

या संदर्भांत त्यांच्या समाजजीवनाचा तपशील देण्याचें कारण नाहीं. पण त्यांच्या जीवनाचा भौतिकतंत्रविषयक आधार त्यांच्या समाजजीवनाच्या मानसिक व सांस्कृतिक चौकटीपासून अलग करतां येणार नाहीं. म्हणून याबाबतींत दोन मुद्द्यांवर भर देण्याची जास्त जरूरी आहे. आदिवासींचें आर्थिक जीवन केवळ एक विशिष्ट प्रकारचें अर्थकारण नाहीं; तर त्याहूनहि खोल असें तें एक समाजकारण आहे. आदिवासींच्या सामाजिक व्यवहाराच्या चौकटींत मानवी श्रमशक्ति म्हणजे अर्थोत्पादनाचें एक साधन असा अर्थ अभिप्रेत नसतो. श्रमाचें मूल्यमापनहि आणेपैंच्या भाषेंत होत नाहीं. घरबांधणी घ्या किंवा विवाह घ्या, कोणत्याहि प्रसंगीं सर्व जमात एकत्र येते. प्रत्येकजण अंगमेहनत करून किंवा इतर लहानसहान मदत करून अंगीकृत कार्याला हातभार लावतो. इतकेंच नव्हे तर श्रमांची व वस्तूंची देवघेव होते तिचीहि गणती आर्थिक भाषेंत नाहीं. फर्थ म्हणतो, "सामाजिक दर्जाप्रमाणें झीज सोसावी लागते आणि सामाजिक दर्जानुसार प्राप्त होणाऱ्या हक्कानुसारच वांटा मिळतो." दर्जा-










प्रमाणें कर्तव्य आणि अधिकार हा त्यांच्या विनिमयाचा सामाजिक पाया आहे. त्याचप्रमाणें उधारी आणि कर्जाच्या बाबतींतहि नेहमीं व्याजबट्टा लावतातच असेंहि नाहीं. प्रत्येक आदिवासी समाजाचे या प्रश्नासंबंधी निरनिराळे प्रघात आहेत. व्याजाचे दर कर्जाच्या मुदतीवरहि अवलंबून नाहींत. कांहीं समाज मुदत कोणती कां असेना सरसकट एकच दर आकारतात. कांहीं घेतच नाहींत. नाहीं तरी भांडवल ही एक सामाजिक कल्पनाच होय.

आदिवासींना जमीनधान्याची कोणतीच पद्धत अवगत नाहीं असें समजणें रास्त ठरणार नाहीं. पण सामूहिक जीवनाशीं अगदीं निकट रीतीनें त्या पद्धतीची गुंफण करण्यांत आली आहे. जमीनमालकीला फक्त सामाजिक अर्थच असू शकतो. आणि तिची मांडणीहि सामाजिकच असते. जमिनीचा पुरवठा मर्यादित झाला आणि तिला चढाओढीमुळें किंमत प्राप्त झाली तरच जमीनमालकीला कायदेशीर स्वरूप लाभतें. ( जमीनमालकीला कायदेशीर स्वरूप येतें तें प्राप्त होण्याकरितां जमिनीचा मर्यादित पुरवठा व चढाओढीमुळें प्राप्त होणारी किंमत ह्या गोष्टी अपरिहार्य असतात. ) जमिनीच्या वापरालाहि सामाजिक अर्थ असतो. आणि मशागतीसारख्या तांत्रिक बाबतींतील निर्णयहि या सामाजिक रचनेला धरून असतात. उपकाराची फेड अपकारानें नको म्हणून बैगा लोक लाकडी कुळवाचा उपयोग करतात. आणि लोखंडी नांगरानें धरती मातेला दुखविण्याचें टाळतात. या सर्व उदाहरणांवरून एक गोष्ट सिद्ध होते ती ही कीं, आदिवासींची जीवनधारणा व मनोरचना जास्त समुदायनिविष्ट असते.

या विशिष्ट मनोधारणेमुळें लोक आपल्या पुरातन वस्तीलाच धरून राहतात. त्यामुळें नैसर्गिक साधनसामुग्रीची बेसुमार उधळपट्टी झाली आहे. परतफेडीची कोणतीच योजना न योजल्यानें आणि अव्याहत वापरामुळें वृत्तिच्छेद झाला आहे. कांहीं जण आपलें उदरनिर्वाहाचें साधन गमावून बसले. त्यांची समाजव्यवस्था संस्कृतीनें जखडून टाकली आहे. सभोंवतालच्या प्राणिज साधनसंपत्तीचा आत्मकल्याणार्थ उपयोग करतांनाहि त्यांनी अनेक विधिनिषेध पाळले आहेत. बऱ्याच टोळयांना दूध काढणें निषिद्ध आहे. त्यामुळें ते गोरसाला मुकतात. ते अल्पसंतुष्ट असतात. आणि जेमतेम रोजच्या भाकरीचा प्रश्न सुटेल इतपतच काम करतात. अडीअडचणींच्या दिवसाकरितां कांहीं 'वरकड' राखून ठेविली आहे असें दृश्य क्वचितच आढळतें. या संवयीमुळें सकस अन्नाचा अपुरा आहारपुरवठा, ढांसळलेलें आरोग्य आणि मृत्युसंख्येची वाढ या चक्रांत ते सांपडले आहेत. त्यांच्यांतील ज्या लोकांचा नजीकच्या शेजाऱ्यांशीं, व्यापाऱ्यांशीं किंवा कंत्राटदारांशीं संबंध येतो त्यांना तर अधिकच काबाडकष्ट सोसावे लागतात. नगरवासीयांच्या सुसंस्कृत युक्त्याप्रयुक्त्या या सीध्या लोकांनां अवगत नसतात. आणि त्यामुळ त्यांची हमखास नाडवणूक होते. कर्जबाजारीपणा, रोगराई, दारूबाजी हीं आजच्या आदिवासी जीवनाचीं जणू वैशिष्ट्येंच झालीं आहेत. आदिवासी जीवनमूल्यांना कसर लागली आहे. आणि ते लोक न्यूनगंडानें पछाडले आहेत.

### प्रयोगाचें स्वरूप

कोरापुटचीहि हीच स्थिति आहे. आणि म्हणून भारतांतील २५ लाख आदिवासींचा प्रश्न सोडविण्यास कोरापुटच्या प्रयोगाचा एखाद्या दीपस्तंभाप्रमाणें उपयोग होईल, या प्रयोगाकडे मानवजातिशास्त्राचा अभ्यासू दोन कारणानें खेचला जातो. विपत्ति आणि विघटनेंचे आवश्यक मानण्यांत येणारे मधले टप्पे टाळून आदिवासींना सर्वोदयाचा मार्ग चोखाळतां येईल ही गोष्ट कोरापुटच्या प्रयोगाला यश आलें तर सिद्ध होईल. ( आणि दुसऱ्या बाबतींत ) जे भाग कमालीचे मागासलेले आहेत आणि प्रगतीच्या प्राथमिक अवस्थत आहेत असें मानण्यांत येतें तेथें कुठलीहि नवी भर न टाकतां जी उपलब्ध साधनांच्या साह्यानें योग्य प्रतवार मांडणी आणि योजना केली तरी त्यायोगें राष्ट्रीय उत्पादनसंपत्तीचा परिपोष होऊं शकतो ही गोष्ट निदर्शनास येईल.

हे दोन्ही प्रश्न परस्परसंलग्न आहेत आणि त्यांचीं उत्तरेंहि परस्परांवर अवलंबून आहेत ही गोष्ट मान्य करावीच लागेल. उदा० संक्रमणकाळांतील दिशाभूल आणि दुःख जर आपण कमी करूं शकलों तर उगाचच अनुत्पादक बाबींवरचा खर्च आपण टाळू शकूं व संपत्तीची त्याप्रमाणांत बचत होईल.

जमिनीच्या खाजगी वैयक्तिक मालकीची कल्पना एकदां कां त्यांच्यांत रुजली कीं सहकारी उत्पादनाच्या



अनुक्रमणिका







मार्गांत तो एक निश्चित अडथळा निर्माण होईल आणि मग योग्य अशी नवी भूमिका पुनः तयार करण्याकरितां अकारण अनेक मार्गांचा अवलंब करावा लागून बरेच श्रम फुकट जातील.

आदिवासींचें विकसित असें स्वतंत्र सामाजिक जगत् असतें. तथील समाजधारणा व संस्कृतीची मांडणी निराळी असते. तिचें तंत्रहि अत्यंत मागासलेल्या अशा प्राथमिक अवस्थेंत आढळतें. सुसंस्कृत जगाच्या विकासप्रवाहापासून तें कित्येक वर्षें दुरावलेलें जीवन आहे. जरी सामाजिक श्रेणीच्या कल्पनेपासून तें पूर्णपणें अलिप्त नसलें तरी जातिसंस्थेनें जखडलेल्या समाजापासून तें भिन्न आहे; आणि अधिक लवचिक आहे. पण अशा आदिवासी गटांचा जेव्हां जातिप्रधान समाजाशीं संबंध येतो तेव्हां ह्या नव्या समाजाच्या सामाजिक प्रतवारीचा ह्या उपऱ्या लोकांना प्रतिकूल अनुभव येतो, त्यांच्यावर अन्याय होतो आणि त्यांना अगदीं कनिष्ठ स्थान मिळून त्यांच्या जीवनपद्धतीचा मागमूसहि शिल्लक रहात नाहीं. ग्रामराज्य आदिवासींना ह्या बाबतीत विशेष उपयुक्त ठरेल. जातिव्यवस्थेंतील कित्येक विसंगति, विकृति आणि विकार त्यांना टाळतां येतील.

## नव्या विकासमार्गांची आवश्यकता

या भागांतील साधनसंपत्तीची नव्या रीतीनें संघटना करण्याचे मार्ग जर आपण शोधून काढले तर राष्ट्रीय विकासाला अनिष्ट वळण लागण्याचें कारण राहणार नाहीं. उलट अन्नधान्य आणि कच्चा माल यांचें मात्र उत्पादन वाढेल. ह्याचाच अर्थ असा कीं, आधीच अपुऱ्या असलेल्या भांडवलसंचयांतील कोणताहि हिस्सा न घेतासुद्धां या भागांतील मानवी उत्पादनक्षमता वाढेल. या अर्थकारणाला ( बिन भांडवली ) श्रमप्रधान उत्पादनतंत्र असें नांवहि सार्थ ठरेल. ह्या विशिष्ट साधनाचा खराखुरा फायदा आदिवासींच्या दुरावलल्या आणि कमालीच्या साध्या जीवनामुळें प्राप्त होतो. त्यांच्या गरजा कमी म्हणून शिल्लक ( वरकड ) बचत जास्त. हा सर्वच प्रदेश एखाद्या सहकारी संशोधन मंडळाकडे प्रयोगशाळा म्हणून राहिल्यानें ह्या बचतीची नवी भांडवली उभारणीहि अतिशय सुलभ ठरेल.

साधनसंपत्तीच्या प्रमाणबद्ध वापरामुळें आदिवासींच्या अर्थकारणाची कोंडी फुटेल आणि विकासाचा नवा मार्ग व नवी शक्ती निर्माण होईल. कांहीं भागांत विकासाला वाव मिळणें हें दुरापास्त आहे. ही गोष्ट खरी आहे. ते भाग उजाड झाले आहेत आणि नैसर्गिक साधनसंपत्ति आणि मृत्युसंख्या ह्यांचें कोष्टकहि माणसाला प्रतिकूल आहे. पण सुदैवानें बरेच आदिवासी अजूनहि रानांत रहातात. रानांतील साधनसंपत्तीचा अजूनहि शोध आणि पूर्ण उपयोग व्हावयाचा आहे. म्हणून ( आदिवासी परिस्थितीचें ) पुरेसें ज्ञान आणि योग्य साधनें उपलब्ध झालीं तर अजूनहि आदिवासी प्रदेशांत संपन्न आणि सुसंस्कृत लोकजीवन निर्माण होऊं शकेल. अर्थातच या प्रदेशांतील आजची लोकसंख्या कमी आहे. आणि कांहीं आदिवासी समाज तर मृत्युपंथाला लागले आहेत. नव्या सुधारणांमुळें कदाचित कांही काळपर्यंत त्यांच्या लोकसंख्येंतहि भर पडेल. कारण संपत्ति आणि रोगप्रतिबंधक साधनांच्या आगमनामुळें मृत्युसंख्या कमी होईल आणि जननसंख्या वाढेल पण पुनः पुढें जीवनमानाच्या अधिक वाढत्या पातळी बरोबर, जननसंख्या परत एकदां उताराला लागेल.

## ग्रामदान आंदोलनाचें महत्त्व

या दृष्टीनें विचार केला तर ग्रामदान चळवळीला फार मोठें भविष्य आहे. अर्थकारण जितकें जास्त प्राथमिक अवस्थेंत तितकें तें जास्त समष्टिप्रधान. आणि लहान लहान प्रदेशांत तर ग्रामदानाची कल्पना चटकन् ग्राह्य वाटण्याचा संभव आहे. ग्रामदान चळवळ ही विकासाचें एक विशिष्ट असें तंत्र नव्हे तर ती एक विकासाची दिशा आहे. तो विकासमय असा एक प्रवाह आहे. आणि म्हणून ज्यावेळी नव्या गरजामुळें नव्या जाणिवा आणि विचार निर्माण होण्याची जरूरी भासेल त्यावेळी ग्रामदान चळवळींत ते होऊं शकतील.

आदिवासी समाजाच्या विकासाकरितां आदिवासी समाजसंस्थांचा आणि आदिवासी नेतृत्वाचा उपयोग करावा असें द्वितीय पंचवार्षिक योजनेंत सुचविण्यांत आलें आहे. आदिवासी जीवनपद्धतींत कमीतकमी ढवळाढवळ करण्यावर या योजनेचा कटाक्ष आहे. आदिवासींच्या प्रश्नांकडे पहाण्याचा दृष्टीकोन संपूर्णतः सामोपचाराचा, समजूतदारपणाचा असून सत्तेच्या उप-



अनुक्रमणिका






योगास त्यांत स्थान नाहीं. त्यामुळच जमिनीचा धूप न जाण्याची जर खबरदारी घेतली, तर शेतकीच्या जमीनभाजणीपद्धतीला सुद्धां ही योजना हरकत घेत नाहीं. यामुळें आदिवासी ग्रामदानी गांवांतसुद्धां जमीन-मशागतीचे सुधारलेले मार्ग वापरण्याचें जमेल.; डोंगरमाथ्यांवर व उतारांवर वृक्षारोपण करतां येईल; कॉफी किंवा काजूचें पीक काढतां येईल. आणि इतरहि कित्येक मार्ग वापरून पहातां येतील. डोंगरमाथ्याला जमीन भाजणी आणि उतारावर टप्याटप्याची शेती असा मधला मार्गहि काढतां येईल. अशातऱ्हेच्या योजनाबद्ध वापरामुळें जमिनीच्या कसाला हल्लीं पोहोंचणारा धोका किमान पातळीवर ठेवतां येईल आणि त्याबरोबरच आदिवासी समाजजीवनांत कमीतकमी ढवळाढवळ होईल.

आदिवासी जनतेंतील शिक्षणप्रसाराला वसतिगृहांचा उपयोग होईल. त्यांच्या नीतिकल्पना निराळ्या आहेत. लैंगिक बाबतींत बरीच मोकळीक आहे. आपल्या 'सुसंस्कृत' नीतिकल्पना त्यांच्यावर लादण्याच्या घाईत त्यांच्या जीवनांत नव्या मानसिक विकृती व गुंतागुंती मात्र निर्माण होण्याचा धोका आहे. त्याऐवजीं हळूहळू शिक्षणद्वारा त्यांच्या दृष्टिकोनांत इष्ट तो फरक घडवून आणतां येईल. फावला वेळ गुंतविण्यास पुरेसें कामच नाहीं अशा अवस्थेंत व्यक्तिजीवनाचा बराच भाग लैंगिक बाबतींत खर्च होणें साहजिक आहे. अशा वेळीं वसतिगृहांची पद्धती फार मोलाची ठरेल. वर दिग्दर्शित केलेल्या साधनांच्याद्वारा समाजधारणेंतच जर बदल घडवून आणतां आला तर वेळ जाण्यास पुरेसें काम मिळेल. उरलेल्या वेळांत करमणुकीचीं नवीं साधनें उपलब्ध होतील आणि मग ह्या बाबतींतील दृष्टिकोन आमूलाग्र बदलेल.

म्हणून आदिवासी जीवनविकासाच्या चळवळीला सभोंवतालच्या परिस्थितीपासूनच सुरुवात करावी लागेल. त्याचा परिपाक म्हणून कदाचित् सर्वोदयी समाजरचनाहि प्रस्थापित होईल. कदाचित् म्हणण्याचें कारण असें कीं, आदिवासी समाज व प्रदेश एकदां कां राष्ट्रीय अर्थकारणाचा अविभाज्य घटक बनला कीं, त्याच्या भविष्याचा प्रश्न आणि विकासाची दिशा आपोआप सबंध भारतीय अर्थकारणाच्या दिशेवर अवलंबून राहील.

### व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न

व्यक्तिस्वातंत्र्याचा व्यापक प्रश्नहि येथें उपस्थित होतो. आदिवासींच्या बाबतींत ह्या प्रश्नाचें स्वरूप सोपें आहे. आदिवासी जीवन समष्टिप्रधान आहे. आणि पारंपरिक आहे. आणि म्हणून स्वातंत्र्य ह्या संज्ञेचें विचारविश्व त्याला परिचित नसतें. सर्वोदय तत्त्वज्ञानामुळें स्वातंत्र्य या कल्पनेला पेलून धरण्याची धमक हळूहळू त्यांच्या अंगांत येऊं लागेल. ही जाणीव निर्माण व्हावी म्हणून साधनसंपत्तीचा सामूहिक वापर करतेवेळीं पाशवी शक्तीला किंवा मानसिक दडपणाला त्यांत कोणतेंच स्थान असतां कामा नये. त्याचप्रमाणें तेथें निर्जीव व्यक्तीलाहि गोंजारून चालणार नाहीं. खराखुरा सहकार हाच सामूहिक जीवनाचा आधार असेल. पण त्याबरोबरच समाजानें गतिशीलताहि राखली पाहिजे. कोणत्याहि नव्या सुधारणेची गति अबाधित राहणें अत्यंत आवश्यक आहे. समाज विकासयोजनांत याच कारणाकरितां टिकाऊ स्वरूपाचें कांहींहि आढळत नाहीं. त्यांना स्वयंभू प्रेरणा नाहीं आणि लोकांच्या खऱ्या गरजा सोडविण्यास त्या अपात्र ठरल्या आहेत.

विकासाचे दोन मार्ग आहेत. कधी त्याची प्रेरणा स्वयंभू असते. कधी ती बाह्य असते. पण बाह्य प्रेरणेचा उद्देश अंतर्गत विकासप्रेरणा जागृत करण्याचाच असला पाहिजे. समाजविकास-योजनांना या बाबतींत अपयश भोगावें लागलें. ग्रामदानी गांवांनासुद्धां आर्थिक व इतर बाबतींत सरकारी पाठबळावर कदाचित् अवलंबून रहावें लागेल. आणि या बाबतींत दक्षताहि बाळगावी लागेल. बिनसरकारी यंत्रणांनीं शक्यतों स्वावलंबी बनण्याचा प्रयत्न करणें अधिक हितावह असतें. हा भेद मूलगामी आहे. म्हणून ग्रामदानी गांव व सरकार यांच्यामधील सहकाराची व्याख्या व अर्थ जास्तीतजास्त स्पष्ट व सुलभ करण्यांत यावा.

### स्वयंपूर्णतेची कल्पना

स्वयंपूर्णतेचा प्रश्नहि बराच वादग्रस्त आहे. स्वयंपूर्णता हा सापेक्ष विचार आहे. ग्रामीण स्वयंपूर्णता ह्याचा अर्थ कांहीं गांवांच्या मिळून बनलेल्या गटांची स्वयंपूर्णता असाहि होऊं शकेल. त्यायोगें सर्वांच्याच विविध साधनांचा परस्परांना पूरक असा उपयोग होईल. कांहीं साधनांच्या प्रादेशिक स्वयंपूर्णतेचाहि मार्ग हाताळावा लागेल. कोणतीहि कल्पना किंवा दृष्टिकोन








असेना, केवळ स्वयंपूर्णतेवर भर देऊन चालणार नाहीं. खरा रोख विकसित आणि अविकसित, पुढारलेल्या आणि मागासलेल्या प्रदेशांतील विषमता नष्ट करण्यावर असावा: ग्रामीण व नागरी, शेतकी व औद्योगिक अशा द्वंदांतून समतोलपणा राखण्यावर भर असावा. भांडवलसंचयाची गती वाढेल, राष्ट्रीय उत्पादन आणि उत्पन्न जास्तींतजास्त होईल आणि त्याचवेळीं हा खटाटोप ज्यांच्याकरितां आहे त्या व्यक्तींच्या कल्याणाकडे दुर्लक्ष्य होणार नाहीं अशा बेतानें राष्ट्रीय साधनसामुग्रीची प्रमाणबद्ध, अचूक व अधिकांत अधिक फलदायी अशी योजना करणें हें आपलें ध्येय असावें. आणि म्हणूनच कोरापुट हा भारतीय अर्थव्यवस्थेचा भाग बनला पाहिजे. ह्या गोष्टीचा विसर पडल्यास कोरापुटचें विकासकार्य यशस्वीपणें पार पाडतां येणार नाहीं.

या लेखांत मागासलेल्या आदिवासी प्रदेशांत ग्रामदानी चळवळीला काय प्रयत्न करतां येतील हें शोधण्याचा प्रयत्न केला आहे. या आंदोलनाचा जास्तींत जास्त फायदा घेण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे. आपल्या अर्थकारणाला आज अतिरिक्त संपत्ति वा भांडवली संचयाची अत्यंत मोठी गरज आहे. ती गरज येथें अंशतः पुरी होऊं शकेल.

---

## टिळकांमध्यें ही व्यापकता होती

टिळकांचा गुण हा होता कीं त्यांनीं जें कांहीं केलें त्यांत सर्व हिंदुस्थानचा विचार केला. टिळकांच्या अस्थि मुंबईला पडल्या म्हणून तेथें त्यांच्या मूर्ति होतील. ते पुण्यांत राहिले म्हणून तेथें त्यांचीं स्मारक-मंडळें होतील. त्यांनीं मराठींत लिहिलें म्हणून मराठी भाषेंत त्यांचीं स्मारकें होतील. परंतु टिळकांनीं जेथें जें कांहीं केलें, मग तें कोणत्याहि गांवीं, कोणत्याहि भाषेंत केलें असो, तें सर्व हिंदुस्थानकरितां केलें. त्यांना हा अभिमान नव्हता कीं मी ब्राह्मण आहे, महाराष्ट्राचा आहे. त्यांच्यांत वेगळेपणाची, भेदाची भावना नव्हती. ते महाराष्ट्रांत होते तरी त्यांनीं विचार केला हिंदुस्थानचा. ज्या अर्वाचीन महाराष्ट्रीय विभूतींनीं सर्व भारतवर्षाचा विचार केला, त्यांत टिळक एक होते. टिळकांनीं महाराष्ट्राला आपल्या खिशांत ठेवलें आणि सर्व हिंदुस्थानकरितां ते लढत राहिले. जो खरी सेवा करूं इच्छितो त्याला ती सेवा कांहीं मर्यादित स्थानींच करावी लागेल. परंतु त्या मर्यादित स्थानीं राहून करण्यांत येणाऱ्या सेवेमागें जी वृत्ति राहील ती विशाल, व्यापक आणि अमर्यादित असली पाहिजे. शालिग्राम मर्यादित आहे. परंतु त्यांत मी ज्या ईश्वराचें दर्शन करतों, तो सर्व ब्रह्मांड व्यापी, स्थिर-चर, जड-चेतन, सर्वांत निवास करणाराच आहे.

टिळकांमध्यें ही व्यापकता होती. मी भारतीय आहे, अशी सुरवातीपासूनच त्यांची वृत्ति होती. बंगालमध्यें चळवळ सुरू झाली. त्यांनीं धांवत जाऊन तींत मदत केली. बंगालला साथ देण्याकरितां महाराष्ट्राला उभें केलें. स्वदेशीचा डंका वाजविला. बंगाल लढाईच्या मैदानांत उभा आहे तर आपणहि गेलेंच पाहिजे, जें बंगालचें दुःख तें महाराष्ट्राचेंहि दुःख आहे, अशी व्यापकता, सार्वराष्ट्रीयता टिळकांमध्यें होती. म्हणूनच पुण्याचे रहिवाशी असूनहि ते हिंदुस्थानचे प्राण बनले.

— विनोबा








प्रा. ग. वा. तगारे

# ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा

ज्ञानेश्वरांनीं आपल्या गीता–टीकेच्या उपसंहारांत आपली परंपरा पुढील शब्दांत सांगितली आहे:

क्षीरसिंधु परिसरीं । शक्तीचां कर्णकुहरीं ।
नेणों कें श्रीत्रिपुरारीं । सांगितलें जे ।। १७५१ ।।
तें क्षीरकल्लोळाआंतु । मकरोदरीं गुप्तु ।
होता तयाचा हातु । पैठें जालें ।। १७५२ ।।
तो मत्स्येंद्र सप्तशृंगीं । भग्नावयवा चौरंगीं ।
भेटला कीं तो सर्वांगीं । संपूर्ण जाला ।। १७५३ ।।
मग समाधि अव्यत्यया । भोगावी वासना यया ।
ते मुद्रा श्री गोरक्षराया । दिधली मीनीं ।। १७५४ ।।
तेणें योगाब्जिनी सरोवरू । विषयविध्वंसैकवीरू ।
तिये पदीं का सर्वेश्वरू । अभिषेकिले ।। १७५५ ।।
मग तिहीं तें शांभव । अद्वयानंद वैभव ।
संपादिलें सप्रभव । श्री गहिनीनाथा ।। १७५६ ।।
तेणें कळि कळितु भूतां । आला देखोनि निरुता ।
ते आज्ञा श्री निवृत्तिनाथा । दिधली ऐसी ।।१७५७।।
ना आदिगुरूशंकरा– । लागोनि शिष्यपरंपरा ।
बोधाचा हा संसारा । जाला जो आमुते ।। १७५८ ।।

– ज्ञानेश्वरी ( दांडेकर प्रत ) अ. १८.

वरील ओव्यांवरून ज्ञानेश्वरांची आपल्या गुरुपरंपरेबद्दल अशी समजूत दिसते कीं, त्यांच्या परंपरेचे संस्थापक आदिनाथ हे अति-मानव–भगवान् शंकर –असून मानवी संस्थापक मत्स्येंद्रनाथ ऊर्फ मीननाथ आहेत. या मत्स्येंद्रनाथांनीं नाशिक जिल्ह्यांतील सप्तशृंगीला भेट देऊन भग्नावयव चौरंगीनाथांना सर्वांगीं संपूर्ण केलें व त्यांनींच ( मत्स्येंद्रनाथांनीं ) गोरक्षनाथांना अनुग्रह दिला. गोरक्षनाथांनीं शंकरापासून आलेलें परंपरागत 'अद्वयानंद वैभव' श्रीगहिनीनाथांना दिलें व तें श्री निवृत्तिनाथामार्फत ज्ञानेश्वरांना मिळालें.

सारांश त्यांनीं दिलेली गुरुपरंपरा अशी आहे.

```
                 आदिनाथ
                    |
      मत्स्येंद्रनाथ अथवा मीननाथ
                    |
      ---------------------------
      |                         |
   गोरक्षनाथ                चौरंगीनाथ
      |
   गहिनीनाथ
      |
   निवृत्तिनाथ— ज्ञानेश्वर.
```

रूढपरंपरेच्या आधारावर प्राचार्य शं. वा. दांडेकर ज्ञानेश्वरांचें घराणें व ही नाथपरंपरा यांचा पुढील प्रमाणें गुरुशिष्य संबंध होता, असें मानतात :

```
गोरक्षनाथ ——————————> त्र्यंबकपंत
    |                       |
गहिनीनाथ ——————————> गोविंदपंत-नीराबाई
    |                       |
    |                   विठ्ठलपंत
    |                       |
    ————————————————> निवृत्तिनाथ
```

प्रत्येक पिढीची ३० वर्षांची कालमर्यादा जर मानली तर त्र्यंबकपंतांचा काळ निवृत्ति-ज्ञानदेवापूर्वी ९० वर्षे ठरतो, व ज्ञानेश्वर इ. स. च्या १३ व्या

१ ज्ञानेश्वरी–प्रस्तावना पृ. ३९.

शतकांत होऊन गेले हें निश्चित असल्यामुळें, गहिनीनाथांचे व ज्ञानेश्वरांच्या पणजोबांचे–त्र्यंबकपंताचें–गुरू गोरक्षनाथ १२ व्या शतकांत होऊन गेले असावेत असें दिसतें. परंतु नाथपंथांतील सुप्रसिद्ध योगी, ग्रंथकार व प्रभावी व्यक्तिमत्त्वानें तत्कालीन भारतावर छाप टाकणारे नेते गोरक्षनाथ विक्रमसंवताच्या १० व्या शताब्दींत होऊन गेले असें डॉ. हजारीप्रसाद द्विवेदी मानतात[२]. डॉ. बड्थ्वाल त्यांचा काल विक्रमसंवत् ११ वी शताब्दि समजतात[३]. तर महापंडित राहुल सांकृत्यायन गोरखनाथ राजा देवपालाचे ( इ. स. ८१५–५४ ) समकालीन होते असें निश्चित विधान करतात[४]. वरीलपैकी कोणताहि काल मानला तरी त्र्यंबकपंताचे मोक्षगुरु गोरक्षनाथ व मत्स्येंद्रनाथशिष्य गोरक्षनाथ हे भिन्नपुरुष असावेत.

मत्स्येंद्रनाथ व गोरक्षनाथ यांचें गुरु-शिष्यत्व-संबंधा-बद्दल एकमत आहे. तेव्हां मत्स्येंद्रनाथांचा काल निश्चित झाल्यास गोरक्षनाथांची कालनिश्चिति होईल. काश्मीरी पंडित आचार्य अभिनव गुप्तानीं **क्रमस्तोत्र** इ. स. ९९१ मध्यें रचलें, व **ईश्वरप्रत्यभिज्ञेवरील** टीका इ. स. १०१५ मध्यें लिहिली. यावरून त्याचा काल इ. स. च्या १० व्या शतकाचा उत्तरार्ध व ११ व्या शतकाचा पूर्वार्ध ठरतो. याच अभिनवगुप्ताचार्यांनीं आपल्या **तंत्रालोकांत** मत्स्येंद्रांना वंदन केलें आहे. यावरून मत्स्येंद्रनाथ अभिनवगुप्ताहून प्राचीन ठरतात. राहुल सांकृत्यायनांनीं तिबेटी परंपरेच्या आधारानें मीनपा (मीनपाद = मीनतनाथ ) अथवा मत्स्येंद्र आणि वज्रयानीसिद्ध कण्हपा = कानीफनाथ यांनासुद्धां राजा देवपालाशीं समकालीन ठरविलें आहे[५]. डॉ. शहिदुल्लांनीं Les chants mystiques च्या प्रस्तावनेंत मत्स्येंद्रनाथ नेपाळमध्यें राजा नरेंद्रदेवाचे कारकीर्दींत इ.स. ६५७ मध्यें होऊन गेल्याचे पुरावे दिले आहेत[६].

तिबेटी ग्रंथांच्या पुराव्यावरून इ. स. ८०० ते ११०० या कालखंडांत होऊन गेलेल्या नाथ-परंपरेची यादी पुढील प्रमाणें आहे : [७]

सरहपा ( = सरह- पाद ) > शबर > लुई > दारिक > घंटा > जालंधर > मत्स्येंद्र

तिबेटीपरंपरेप्रमाणें मत्स्येंद्रनाथ नाथसंप्रदायाचे संस्थापक नसून सरहपाद हे संस्थापक ठरतात व मत्स्येंद्रनाथ आचार्य सरहपादापासून ७ व्या पिढीचे शिष्य होत.

वरील पुराव्यावरून पुढील निष्कर्ष निघतातः

( १ ) गोरक्षनाथांनीं त्र्यंबकपंतांना अनुग्रह दिला असल्याची समजूत खरी नसावी. ती खरी असल्यास मत्स्येंद्रशिष्य गोरक्षनाथांच्या परंपरेंतील हे दुसरे गोरक्षनाथ असावेत.

( २ ) ज्ञानेश्वरांच्या ब्रह्मविद्यावंशांतील मत्स्येंद्र> गोरक्ष... > गहिनी > निवृत्ति एवढेच पुरुष त्यांना माहीत असावेत व गोरक्षनाथ ते गहिनीनाथ

२ **नाथपंथ** पृ. ९६, हिंदुस्तान एकेडेमी, इलहाबाद इ. स. १९५०

३ **गोरखबानी** : भूमिका पृ. २०, हिंदीसाहित्यसंमेलन, प्रयाग वि. सं १९९९

४ सरहपादकृत–**दोहाकोशः** भूमिका पृ. २२, बिहार राष्ट्रभाषा परिषद्, पटना इ. स. १९५७
याच ग्रंथकारांनीं ( राहुल सांकृत्यायन ) **गंगापुरातत्त्वांकामध्यें** उपर्युक्त देवपाल राजाचा काल ( इ. स. ८०९–८४९ ) मानला आहे.

५ तिबेटी परंपरेंत मीनपा ( मीननाथ ) मत्स्येंद्रनाथाचे वडील आहेत. नेपाळमध्यें त्यांना मत्स्येंद्राचे धाकटे बंधु मानतात, **वर्णरत्नाकरांत** मीनपा व मत्स्येंद्र एकच मानले गेले आहेत.

६ शहिदुल्ला–Les chants mystiques पृ. २५–२९

७ सरहपादकृत **दोहाकोशः** भूमिका पृ. २२, पटना इ. स. १९५७










या २०० वर्षांच्या कालखंडांतील पुरुष ज्ञानेश्वरांना माहीत नसावेत किंवा उल्लेखनीय वाटत नसावेत.

(३) मत्स्येंद्रनाथ व मीननाथ हीं एकाच व्यक्तीचीं दोन नांवें आहेत असें त्यांचें (ज्ञानेश्वरांचें) मत होतें.[८]

(४) सरहपाद ते जालंदरनाथापर्यंतची गुरुपरंपरा ज्ञानेश्वरांना माहीत नसावी.

(५) नाथपंथाचे मूळपुरुष आदिनाथ शंकर होत ही तत्कालीन समजूत ज्ञानेश्वरांना मान्य होती.

ज्ञानेश्वरांच्या गुरुपरंपरेचे मूळपुरुष सरह-पाद हे हाडामांसाचे-मानवी-आचार्य असल्यामुळें, ' सरह-पाद व्यक्ति व तत्त्वज्ञान ' यांचा विचार करणें ज्ञानेश्वरांचे तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाचे दृष्टीनें आवश्यक आहे.

८ **गोरक्षशतकांत** व **गोरक्षसिद्धान्तसंग्रहांत** हेंच मत मान्य केलेलें आहे.

---

प्रा. र. चिं. वडवे

# 'इंग्रजी' विषयीं थोडें अधिक

ब्रिटिश राजवटींत राज्यकार्याची व प्रतिष्ठेची भाषा म्हणूनच इंग्रजीकडे पहाण्याचा दृष्टिकोन सर्वत्र पसरला गेल्यानें, स्वातंत्र्यसंपादनानंतर या भाषेचें काय करावयाचें, भारतीय शिक्षणपद्धतींत, विशेषतः उच्च शिक्षणांत तिला स्थान द्यावयाचें कीं नाहीं व द्यावयाचें असल्यास कोणतें इत्यादि प्रश्नांची चर्चा गेलीं १० वर्षे सर्वत्र चालू आहे. परंतु या बाबतींत इतक्या दीर्घकालीन चर्चेनंतरहि कांहीं अखिल भारतीय असें धोरण निश्चित झालेलें दिसत नाहीं. मध्यवर्ती सरकारहि या बाबतींत बहुतांशीं मूग गिळून बसलेलें असल्यानें नजीकच्या भविष्यकाळांत त्याचें धोरण निश्चित होण्याची शक्यताहि बेताचीच दिसते. शिक्षण हा विषय जरी मुख्यतः राज्यसरकारांच्या अखत्यारींतील असला तरी त्या क्षेत्रांतील कांहीं बाबतींत तरी अखिल भारतीय धोरण असणें देशहितदृष्ट्या इष्ट आहे. निदान इंग्रजीच्या बाबतींत तरी तसें निश्चयानें म्हणतां येईल. असें धोरण आंखण्याचें कार्य मध्यवर्ती सरकार, भारतीय विद्यापीठांचें मंडळ (Inter-Universities Board of India) आणि विद्यापीठ अनुदान समिती (Universities Grants Commission) यांनीं परस्पर विचारविनिमय करून व विद्यापीठांचीं मतें अजमावून करावयास हवें. परंतु तसें तें करतांना दिसून येत नाहींत. मग या निष्क्रियतेचा उगम निर्णय घेण्याच्या अगर घेतलेले निर्णय कार्यवाहींत आणण्याच्या असमर्थतेंत असो कीं मूळ जबाबदारीच्या जाणिवेच्या अभावांत असो. सर्वांत आश्चर्याची गोष्ट म्हणजे खास भाषाविषयक शिफारशींसाठीं नेमलेल्या खेर-कमिशननेंहि हा प्रश्न जणुं अस्तित्वांतच नाहीं अशा थाटांत आपल्या शिफारशी केल्या आहेत. अशा स्थितींत कांहींना कांहीं सुव्यवस्थित व साधार मतें असणाऱ्या सामान्य नागरिकांना या विषयाला तोंड पाडून निर्णय लावून घेण्याचा एकमेव मार्ग म्हणजे वृत्तपत्रीय चर्चा हाच होय व याचा उपयोग बऱ्याच जणांनीं केला आहे. एप्रिल १९५६ च्या नवभारताच्या अंकांत माझाहि एक लेख प्रसिद्ध झाला व तदनंतरच्या भाषा, संस्कृति व राज्य विशेषांकांतहि कांहींनीं या विषयाला उजळा दिला, इतरत्रहि अशी चर्चा चालू आहे. सर्वसाधारणपणें इतकें म्हणावयास हरकत नाहीं कीं या चर्चेमुळें ज्ञानार्जनाची भाषा म्हणून इंग्रजीचें महत्त्व विचारवंतांना बहुतेक मान्य झालेलें असून माध्यमिक व उच्च शिक्षणांत हा विषय आवश्यक म्हणून असावा असें लोकमतहि पुष्कळांशीं तयार झालें आहे. ही घटना स्वागतार्ह असली तरी निवळ इतक्यावर आपला हेतू साध्य होईल असें मात्र मुळींच म्हणवत नाहीं. इंग्रजी शिकलें पाहिजे याच्या इतकेंच कोणत्या प्रकारचें इंग्रजी शिकलें पाहिजे यालाहि आमच्या मतें महत्त्व आहे व या संबंधींचाच ऊहापोह या लेखांत करण्याचा मानस आहे.

## ज्ञानाचा मार्ग खुला कसा राहणार ?

मुंबई राज्यांतील एका विद्यापीठाच्या कार्यकारिणीवर असलेल्या व गेलीं ४०।४५ वर्षे शिक्षणक्षेत्रांत उच्च पातळींत कार्य केलेल्या एका सन्मान्य गृहस्थांशीं बोलण्याचा योग आला असतां पुढील आशयाचीं प्रश्नोत्तरें झालीं. पदवी परीक्षेच्या (बी.ए., बी. कॉम, बी. एस्. सी., एल्एल् बी इत्यादि) वर्गांना

इंग्रजी बोधभाषेंत शिकवावें कीं प्रादेशिक भाषेंत असा प्रश्न विचारतां सदरहू गृहस्थ चटकन उद्गारले कीं 'प्रादेशिक भाषेंत'. मग पुढील प्रश्न आला कीं असें शिक्षण घेतलेल्या या पदवीधरांना इंग्रजींतील ग्रंथ समजणार कसे ते न समजल्यास त्यांचें स्वविषय विषयक ज्ञान अद्यावत रहाणार कसें व ज्ञान-प्राधान्याच्या चालू जमान्यांत त्यांच्या हातून देश प्रगतीचा गाडा पुढें रेटला जाणार कसा ? त्या गृहस्थांनीं अगदीहि न कचरतां उत्तर दिलें कीं या सर्व परीक्षांसाठीं इंग्रजी हा विषय अवश्य असल्यानें ही अडचण उत्पन्न होण्याचें मुळीच कारण नाहीं. सदरहु गृहस्थ उच्चाधिकारावर असल्यानें अधिक खोलांत जाऊन चर्चा करणें शक्य झालें नाहीं. व त्याचा उपयोगहि नव्हता. परंतु याच प्रकारचे विचार बऱ्याच चांगल्या चांगल्या मंडळींच्याहि डोक्यांत घर करून बसलेले असल्यानें व विद्यापीठांच्या (निदान मुंबई राज्यांतील) धोरणावरहि त्याच विचारांची छाप दिसून येत असल्यानें त्यांत कांहीं दोष असेल हें सकृद्दर्शनीं लक्षांत येत नाहीं. परंतु पूर्ण विचाराअंतीं हे विचार निर्दोष नाहींत हें कोणाच्याहि लक्षांत येऊं शकेल. इंग्रजी शिकविणें हें जितकें अगत्याचें आहे तितकेंच किंबहुना त्याहूनहि 'शिकविलें जाणारें इंग्रजी' कोणत्या प्रकारचें हवें हें निश्चित करणें अधिक अगत्याचें आहे हें लक्षांत न घेणें हा या विचारसरणींतील प्रमुख दोष होय. हा दोष काढून न टाकल्यास पदवीधरांना सामान्य इंग्रजी जरी थोडें अधिक चांगलें लिहितां वाचतां आलें तरी ज्या हेतूसाठीं त्यांना इंग्रजी शिकवावयाचें तो हेतूच निष्फळ होईल यांत तिळमात्र संदेह नाहीं. हा हेतू म्हणजे, एप्रिल ५६ च्या अंकांतील लेखांत पाहिल्याप्रमाणें, चालू युगांतील देशोन्नतीचें मुख्य साधन जें ज्ञान तें हस्तगत करण्याचा मार्ग खुला ठेवणें हा होय.

## इंग्रजी शिकण्यामागील हेतू

मुद्दा स्पष्ट होण्यासाठीं म्हणून वाचकांच्या अनुज्ञेनें माझेंच उदाहरण घेऊं. प्रशाळे (High school) पासूनच कित्येक विषय इंग्रजींतून शिकण्याच्या व चांगलें इंग्रजी लिहितां वाचतां येणें यावर सर्व शिक्षणा विशेष भर असण्याच्या जमान्यांत माझें शिक्षणचा अगदीं एम्. ए. व एल् एल्. बी. पर्यंत व्यवस्थित व बऱ्यापैकीं गुण मिळवून झालें. चारपांच वर्षें एका लहानशा सरकारी कचेरींत प्रमुख म्हणून काम केलें व तदनंतर गेलीं दहा वर्षें इंग्रजी माध्यमांतून प्राध्यापकी केली. तेव्हां इंग्रजी विषय अवश्य पण बाकी बहुतेक विषय कॉलेजांतील निदान मध्यमा (Intermediate) परीक्षेपर्यंत प्रादेशिक भाषेंतून शिकलेल्या चालू पदवीधरांपेक्षां मला इंग्रजी भाषा अधिक चांगल्या प्रकारें समजूं शकते इतकें मान्य करण्यास कोणासहि हरकत वाटूं नये. आतां माझी स्थिति इंग्रजींतील ग्रांथिक ज्ञानाचें आकलन करण्याच्या बाबतींत कशी आहे ? खुद्द माझ्या विषयांवरील ग्रंथ मला अर्थातच समजूं शकतात पण त्याचें मुख्य कारण म्हणजे मी त्यांचा सर्व अभ्यास इंग्रजींतून केला आहे. परंतु या विषयांखेरीज, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, पदार्थविज्ञान, जीवशास्त्र, वनस्पतिशास्त्र, रसायन इत्यादि जे अनंत विषय आहेत त्यावरील साधे साधे ग्रंथहि मला सहजासहजीं समजूं शकत नाहींत. हीच स्थिति सामान्यपणें सर्व पदवीधरांची आहे यात शंका नाहीं. यावरून आपल्याला असा बोध होतो कीं नुसती भाषा आल्यानें त्या भाषेंतील कोणत्याहि विषयाचें ज्ञान आकलन होऊं शकतें असें मानणें ही एक फार मोठी भूल होय. असें असतें तर वाचतां येण्याइतपत शिक्षण झालेल्या प्रत्येकाला स्वभाषेंतील प्रत्येक ग्रंथ अगर शास्त्रीय स्वरूपाचा लेख आकलन झाला असता व इंग्लंड अमेरिकेंतील बहुसंख्य लोक प्रचंड ज्ञानी बनले










असते. शिक्षणसंस्थांचीं बहुधा गरजच भासली नसती. पण हें असें होत असलेलें दिसून येत नाहीं. ज्ञानार्जनासाठीं शाळा-कॉलेजांत जावेंच लागतें. याचें मुख्य कारण म्हणजे कोणताहि ग्रंथ समजावयाचा असेल तर तो ज्या भाषेंत लिहिलेला आहे त्या भाषेच्या ज्ञानाखेरीज त्या ग्रंथांतील विषयाची परिभाषा पण आत्मसात व्हावयास हवी. त्यांतील प्रत्येक पारिभाषिक शब्द कोणत्या संदर्भांत कोणत्या अर्थानें घ्यावयाचा हें समजावयास हवें. या शब्दज्ञानाचा अभाव असेल तर त्या ग्रंथाचा खराखुरा अर्थ समजणें सर्वथैव अशक्य आहे. या विवेचनावरून देशी भाषा विशिष्ट पातळीइतक्या प्रगल्भ होईपर्यंत इंग्रजी हीच आपली ज्ञानार्जनाची भाषा होय हें एकदां मान्य केल्यानंतर त्या भाषेंतील आपापल्या विषयांची परिभाषाहि व्यवस्थित शिकणें अवश्य आहे. हें सर्वांच्या ध्यानीं येईल. इंग्रजी विषय शिकवितांना प्रत्येक शिक्षकानें हें उद्दिष्ट स्पष्टपणें लक्षांत घ्यावयास हवें. भारतीय शिक्षणरूपी नौकेचें इंग्रजी भाषा हें सद्यःस्थितींत जणुं सुकाणुं आहे. सागरांत विहार करीत असलेली नौका नेमकी कोठें न्यावयाची आहे हें चालीवणाऱ्याला माहीत नसेल अगर त्याकडे त्याचें दुर्लक्ष झालें असेल तर सुकाणुंचा कांहीच उपयोग नाहीं. त्याच्या हालचालींत व्यर्थ कालक्षेप व शक्तिक्षयच होणार. ही आपत्ति टाळून सुकाणुं निश्चितपणें उपयुक्त ठरावयाचें असेल तर नौका कोठें जावयाची आहे याची अगोदर स्पष्ट कल्पना हवी म्हणजे सुकाणूंचा इष्ट वापर करतां येईल. अगदीं याचप्रमाणें ज्ञानार्जन हाच इंग्रजी शिकण्यामागील हेतू होय हें निश्चित झाल्यानंतर त्या त्या विषयाची परिभाषा आत्मसात करून तद्द्वारा संबंधित ग्रंथ वाचावयाची पात्रता उत्पन्न करील अशा प्रकारचें इंग्रजी शिकविलें पाहिजे, हें सर्वांच्या ध्यानीं येईल. आपण जर असें न करूं तर इंग्रजीच्या अध्ययन अध्यापनांत श्रम, पैसा व वेळ खर्च होऊनहि त्यांतून इष्ट ती फलनिष्पत्ति होणें कठीण आहे.

## इंग्रजीचें अपुरें व निरुपयोगी ज्ञान

आतां या साध्या दिसणाऱ्या प्रश्नाचा मुद्दाम व सविस्तर ऊहापोह करण्याचें कारण काय या प्रश्नाकडे वळूं. माध्यमिक शालान्त परीक्षा उत्तीर्ण होऊन महाविद्यालयांत प्रवेशणाऱ्या विद्यार्थीना इंग्रजी बोधभाषेंत मांडलेला विषय समजूं शकत नाहीं म्हणून मुंबई राज्यांतील बऱ्याच विद्यापीठांनीं प्रादेशिक भाषेचा वापर पहिल्या दोन वर्षांसाठीं सुरूं केला व आज ना उद्या पदवीपरीक्षेसाठींहि त्यांना याच मार्गाचा अवलंब करावा लागेल. मात्र ज्ञानार्जनकार्यांतील इंग्रजीचें महत्त्व लक्षांत घेऊन त्यांनीं असा नियम केला कीं शालान्त परीक्षेंत इंग्रजी हा एक विषय घेऊन उत्तीर्ण झालेल्यानांच महाविद्यालयांत प्रवेश द्यावा. येथपर्यंत सर्व ठीक झालें. पुढें देशी बोधभाषेंतून अभ्यास केलेल्यांना इंग्रजींतील ग्रंथ कळणार कसे असा प्रश्न उभा राहिला. कारण ते कळले नाहींत तर या पदवीधराचें ज्ञान डबक्यांतील पाण्याप्रमाणें सांचलेलें, उथळ व अतएव निरुपयोगी राहणार; जगांत प्रतिदिन संवर्धित होणाऱ्या ज्ञानास ते पारखे होणार. तें ज्ञान स्वभाषेंत आणण्याची तर गोष्टच काढावयास नको. या अडचणींतून मार्ग काढण्यासाठीं म्हणून अशी कल्पना निघाली कीं महाविद्यालयांतील सर्व परीक्षांसाठीं इंग्रजी हा विषय आवश्यक म्हणून ठेवावा. विद्यापीठें या मार्गाचा अवलंब सध्यां करीत आहेत. इंग्रजीसाठीं दरसाल पाठ्यपुस्तकें लावीत आहेत व प्राध्यापक तीं पुस्तकें शिकवीत आहेत. अशा प्रकारें इंग्रजीचें अध्ययन तूर्त सुरूं आहे. पाठ्यपुस्तकें कोणतीं लावलीं जातात याचा तपास केल्यास आपल्याला असें सहज कळून येईल कीं ज्यांतील भाषा प्रगल्भ आहे अशी कविता, कांदबरी, लहान गोष्टी, लघुनिबंध हेच विषय असलेलीं

तीं पुस्तकें असतात. उदाहरणार्थ, पुणें विद्यापीठांत, F. Y. Science :-- 1 Essays & Speaches, 2 Mind & Heart of India. Inter Science:— 1 Modern English Prose, 2 Far From the Madding Crowd. Inter Commerce:- 1 Weathering Heights, 2 Living Voices. B. Com:- 1 New World, 2 Passage to India. हीं पुस्तकें नेमलीं आहेत.

सर्व परीक्षांची परिपूर्ण यादी पहाण्याची आवश्यकता नाहीं. वरील नमुन्यादाखल घेतलेल्या उदाहरणावरून इतरांची कल्पना सहज करतां येईल. सर्वच विद्यापीठांतील धोरण याच प्रकारचें आहे. उदाहरणार्थ, गुजराथ विद्यापीठांत F. Y. Science साठीं Jane Eyre ची Charllote नांवाची कादंबरी व कांहीं निवडक इंग्रजीचे वेंचे (Selections), Inter Science साठीं जेम्स हिल्टनची Lost Horison ही कादंबरी व इतर वेंचे इत्यादि पुस्तकें लावलेलीं आहेत. या पुस्तकांच्या अभ्यासानें व्यावहारिक इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व थोडेंफार सुधारणें शक्य झालें तरी इंग्रजीखेरीज इतर विषयांवरील ग्रंथ सांपडणें शक्य होणेंच नाहीं. परिणाम म्हणजे असे ग्रंथ आत्मसात करण्याच्या बाबतींत उपर्युक्त जातीच्या ग्रंथाध्ययनानें प्राप्त झालेलें इंग्रजीचें ज्ञान अपुरें अतएव बहुतांशीं निरुपयोगी होय.

## दूरदृष्टीचें धोरण हवें

आपलीं मुलें शाळाकॉलेजांत पाठविण्याव्यतिरिक्त शिक्षणक्षेत्रांशीं कांहींहि संबंध नसणाऱ्यांच्या लक्षांत या गोष्टी न आल्यास आश्चर्य नाहीं. या लोकांचें पहाणें इतकेंच असतें कीं बौद्धिक स्वरूपाची नोकरी मिळण्यासाठीं वा आहे तींत उच्चाधिकार प्राप्त होण्यासाठीं स्वतंत्र भारतांतहि अद्याप इंग्रजीवरील प्रभुत्व अवश्य आहे. म्हणून इंग्रजी हा विषय पदवीपरीक्षांसाठीं आवश्यक आहे इतकें समजल्यानंतर त्यांना समाधान वाटतें. परंतु देशांतील नवनवीन पिढयांना यथायोग्य शिक्षण देऊन देशोन्नतीचा मार्ग सुगम करण्याची जबाबदारी ज्यांच्यावर आहे त्यांना असा उथळ व वैय्यक्तिक स्वरूपाचा विचार करून कसें चालेल? नजिकप्रमाणें दूरच्या भविष्यकालाचा साकल्यानें विचार करूनच त्यांनी आपलीं धोरणें निश्चित केलीं पाहिजेत. ते जर असें न करतील तर केंव्हांना केंव्हां कर्तव्यच्युतीच्या आरोपास पात्र होतील. मुंबई विद्यापीठानें अशाच स्वरूपाचें इंग्रजी शिकविण्याचें धोरण ठेवलें होतें असा युक्तिवाद करतांना कित्येक जण आढळतात. या लोकांना इतकेंच सांगावेसें वाटतें कीं तें धोरण स्वातंत्र्यपूर्व कालांतील होतें व त्यावेळीं इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व यालाच मुख्य महत्त्व होतें. स्वातंत्र्योत्तर कालांत ही परिस्थिति संपूर्ण पालटलेली आहे व इंग्रजी भाषा शिकण्याच्या हेतूंतहि संपूर्ण परिवर्तन झालेलें आहे. अशा स्थितींत पूर्वींच्याच धोरणाला चिकटून बसल्यास तो सर्वांगीण अपव्यय होय. या देशाचें दुर्दैव असें कीं पूर्वींच्या राजवटींत इंग्रजी प्रतिष्ठेमुळें देशी भाषा ज्ञानदृष्ट्या वृद्धिंगत करण्याच्या कामीं बुद्धिमंतांकडून अतीव दुर्लक्ष केलें गेलें (व त्यामुळें बोधभाषेची समस्या स्वातंत्र्योत्तर कालांत दत्त म्हणून उभी राहिली) व स्वातंत्र्योत्तर कालांत देशी भाषांच्या नांवाखालीं याच वर्गाच्या अदूरदर्शी धोरणामुळें खुद्द ज्ञानाचीच गळचेपी होण्याचा प्रसंग उद्भवला आहे. याचा अंतिम परिणाम मात्र असा होणार आहे कीं मूलभूत स्वरूपाची सर्जनशीलता देशीभाषांत शून्यावर येऊन बसेल. जोपर्यंत इंग्रजी चांगलें जाणणारी मंडळी आहेत तोपर्यंत ही गोष्ट फारशी जाणवणार नाहीं. परंतु दहापांच वर्षांत त्यांची संख्या कमी होऊं लागली म्हणजे देशाला त्याचे खरेखुरे चटके बसूं लागतील. तरी विद्यापीठांनीं व सरकारनेंहि याचा गंभीरपणें विचार तांतडीनें करणें आवश्यक आहे.

इंग्रजी राजवटींत देशी भाषा दुर्लक्षिल्या गेल्या तरी इंग्रजींतून सर्व विषय शिकविले गेल्यानें त्या भाषेंतील ज्ञान सतत उपलब्ध होण्याची सोय होत होती व ज्ञानाची गळचेपी होण्याचा प्रश्नच उपस्थित होण्यासारखा नव्हता. शिवाय त्या काळीं देशाची भरभराट प्रत्यक्ष घडवून आणण्याची सत्ता अगर जबाबदारी लोकांवर तितकीशी नव्हती. निदान ती राज्यकर्त्यांवर आहे असें मानून भागण्यासारखें होतें. आतां परिस्थिति पालटलेली आहे. परकी भाषेच्या गुलामगिरींतून मुक्त होण्याइतकीच देशी भाषा व देशाची सर्वांगीण उन्नति घडवून आणण्याची जबाबदारी आपल्यावर आहे व त्यासाठीं उपयुक्त होईल अशा प्रकारें परकीय भाषा शिकविल्या गेल्या पाहिजेत हें आपण जितक्या लवकर ओळखूं तितकें बरें.

## कांहीं सूचना

यावर कोणीहि सहजच विचारील कीं मग "तुमचें म्हणणें तरी काय आहे ? पुन्हां इंग्रजी बोधभाषेकडे वळावें असें तर तुम्हांस म्हणावयाचें नाहीं ना ? तसें असेल तर तुमच्या स्वभाषा व स्वदेशप्रेमाबद्दल संशयच उत्पन्न होईल". या प्रकारच्या पृच्छकांना प्रथम हें निक्षून सांगितलें पाहिजे कीं स्वभाषा बाल्यावस्थेंत असतांना परकीय भाषा कांहीं काळ बोधभाषा म्हणून स्वीकारली तरीहि, जोपर्यंत स्वभाषेची सेवा व देशोन्नति हें उद्दिष्ट समोर ठेवून असें करण्यांत येईल तोपर्यंत, आपल्या भाषा व देशप्रीतीला बिलकुल बाध येत नाहीं. परंतु हें केवळ तात्त्विक विवेचन झालें. प्रत्यक्ष व्यवहाराच्या दृष्टीनें देशी भाषांचें माध्यम शक्य त्या त्वरेनें-मात्र ज्ञानार्जनाच्या बाबतींत कोणतीहि उणीव उत्पन्न होणार नाहीं अशी परिपूर्ण काळजी घेऊन, चालू करावें असेंच आमचें मत आहे. कारण असें न केल्यास, देशी भाषांना बोधभाषेचा दर्जा न दिल्यास, त्या बाळसें धरणें बहुतांशीं अशक्यप्राय आहे. इतकें मान्य झाल्यानंतर इंग्रजी हा विषय अशा प्रकारें शिकविण्यांत यावा कीं त्यायोगें पदवीधर अगर इतरांना त्या भाषेंतील ग्रंथ आत्मसात करतां यावेत. हें साध्य व्हावयाचें असेल तर हल्लीं ज्या प्रकारचीं पाठ्यपुस्तकें इंग्रजीसाठीं म्हणून लावण्यांत येतात त्याऐवजीं त्या त्या विषयांवरील प्रमाणभूत व मान्यवर असे इंग्रजी ग्रंथ अवश्य इंग्रजीसाठीं म्हणून लावण्यांत यावेत. उदाहरणार्थ, अर्थशास्त्र अगर गणित विषय पदवीसाठीं निवडलेल्या विद्यार्थ्यांनीं त्या विषयाचा अभ्यास देशी भाषेंतून करणें जितकें इष्ट तितकेंच व त्याजबरोबर त्यांना या विषयांवरील प्रमाणभूत अशा एकदोन इंग्रजी ग्रंथांचा अभ्यास करणें अवश्य असावें. अर्थातच त्यांच्यासाठीं तेच ग्रंथ 'आवश्यक इंग्रजी'साठीं म्हणून शिकविण्यांत यावेत. हीच स्थिति इतर विषयासंबंधीं. आम्ही तर यापुढें जाऊन असें म्हणूं कीं परीक्षेसाठीं ज्या प्रश्नपत्रिका काढावयाच्या त्यांचें स्वरूप असें असावें कीं हे इंग्रजी ग्रंथ न वाचणाऱ्याला परीक्षेंत सहजासहजीं उत्तीर्ण होणें कठीण व्हावें. या प्रश्नांमध्यें त्या त्या विषयांवरील इंग्रजी ग्रंथांतील उताऱ्याच्या भाषान्तराचा अगर सारांश काढण्याचा प्रश्नहि अंतर्भूत असणें इष्ट होईल. प्रा. श्री. म. माटे यांनीं पूर्वी एका ठिकाणीं अशी सूचना केल्याचें स्मरतें कीं प्रमाणभूत इंग्रजी ग्रंथांचे देशी भाषांत अनुवाद करणें हीहि एक पदवीपरीक्षाच समजून त्यासाठीं पदवी देण्यांत यावी. ही सूचना, देशी भाषेची सेवा व इंग्रजी ग्रंथ आत्मसात करण्याची पात्रता, या दोन्ही दृष्टींनीं अत्यंत उपयुक्त असून विद्यापीठांनीं गंभीरपणें विचार करण्यासारखी आहे. निदान अशा अनुवादकांना कांहीं पेपरांची सूट मिळण्याचा विचार करण्यास तर मुळींच हरकत नाहीं. तात्पर्य असें कीं आवश्यक इंग्रजीसाठीं जीं पाठ्यपुस्तकें नेमावयाचीं तीं विद्यार्थ्यांनीं पदवीपरिक्षेसाठीं



अनुक्रमणिका






जो विषय निवडला असेल ( अर्थातच भाषाविषय सोडून ) त्यावरील असावींत व विद्यार्थ्यांनीं तीं पुस्तकें व्यवस्थित अभ्यासिलीं आहेत याची निश्चिती करून घेऊनच त्यांना पदवीसाठीं पात्र समजण्यांत यावें. असें केल्यानेंच देशी भाषा समृद्ध होऊं लागतील व इंग्रजीरुपी ज्ञानदरवाजाहि, सध्यांप्रमाणेंच आपल्याला जरूर तितका काळ, उघडा राहील. या बाबतींत हलगर्जीपणा केल्यास तेल व तूप दोन्हीहि जाऊन केवळ धुपाटणें हातीं घेण्याच्याच श्रेयाचे आपण स्वहस्तेंच मानकरी बनूं.

हा विचार थोडया दूरच्या भविष्यासंबंधी झाला. अगदीं नजीकच्या भविष्याचा अगर वर्तमानकालाचा विचार करतां यांत थोडी भर घालावयास हवी. इंग्रजी राज्य जाऊन दहा वर्षें लोटलीं असलीं तरी अद्याप इंग्रजीभाषेची पकड ढिली झाली आहे असें वाटत नाहीं. सरकारी, निमसरकारी अगर खाजगी स्वरूपांच्या नोकऱ्यांसाठीं अद्यापिहि चांगलें इंग्रजी आवश्यक मानण्यांत येतें. घटनेनुसार जरी १९६५ ही इंग्रजीच्या उच्चाटणाची मर्यादा असली तरी घटनेंत बदल केव्हांहि होऊं शकत असल्यानें ही मर्यादा वाढविली जाणें अगदींच अशक्य नाहीं. खेर-कमिशनच्या मतें तर घटनादुरुस्ती न करतांहि हें उच्चाटनाचें कार्य लांबवितां येईल. विद्यापीठांचें व इतर संस्थांचें उच्च दर्जाचें कामहि अद्याप संपूर्णपणें इंग्रजींतूनच चालतें व तेथें देशी भाषा केव्हां येतील तें सांगवत नाहीं. अशी स्थिति चालू असेपर्यंत आम्ही वर सुचविल्याप्रमाणें व्यवस्था करूनहि सध्यां ज्याप्रकारचें इंग्रजी आवश्यक म्हणून शिकविलें जातें तें कायम ठेवून विद्यार्थ्यांना व्यावहारिक इंग्रजी चांगलें येण्याची सोय करण्यास कोणचीच हरकत नाहीं; नव्हे तें इष्टच आहे. या लेखाचा कटाक्ष सध्याचें आवश्यक इंग्रजी नष्ट झालें पाहिजे यावर मुख्यत: नसून बोधभाषा म्हणून देशी भाषांचा उपयोग सुरू केल्यानंतर विशिष्ट प्रकारचें इंग्रजी विद्यार्थ्यांना शिकविण्याची सोय झालीच पाहिजे हें सांगण्यावर आहे. हें सहज ध्यानांत येईल.

### केवळ वावदूकपणानें कसें भागेल ?

आतां देशी भाषांचे कट्टर अभिमानी इंग्रजीबद्दल वेळींअवेळीं जी अनुदारता प्रकट करतात त्यांच्या संबंधीं थोडा विचार करून हा लेख आवरतां घेऊं. अशी मंडळी सर्वच प्रान्तांत अधिक उण्या प्रमाणांत आढळून येतात. विद्यापीठांतील बोधभाषा म्हणून देशी भाषा ताबडतोब सुरू करा, राज्यकारभारांतील भाषेचें त्वरित देशीकरण करा अशा घोषणा ही मंडळी सातत्यानें करीत असतात. खरें पहातां असा बदल घडवून आणण्यास कोणाहि सुज्ञ व जाणत्या माणसाचा विरोध नाहीं व ज्यांच्यावर हा बदल घडवून आणण्याचें उत्तरदायित्व आहे तेहि आपापल्यापरी इष्ट अशी हालचाल करीत आहेत. त्यांच्या बाबतींत फार तर इतकाच आक्षेप घेतां येईल कीं ही हालचाल जितक्या पोटतिडिकेनें व्हावयास हवी तितकी ती होत नाहीं. परंतु त्यांनाहि कांहीं व्यावहारिक अडचणींना तोंड देत देत हा बदल करावा लागतो हें लक्षांत घेतल्यास या मंदगतीबद्दल त्यांना फार मोठा दोष देणें अगर त्यांचे वेळींअवेळीं वाभाडे काढणें न्यायाचें होणार नाहीं असें आम्हांस वाटतें; अर्थात थोडयाफार दोषाचे ते धनी आहेत इतकें मान्य करावयास हवें. परंतु ही मान्यता दिल्यानंतर प्रतिपक्षांच्या कार्याबद्दलहि विचार ओघानेंच येतो. निवळ घोषणा करण्याखेरीज ही मंडळी काय करीत आहेत ? विद्यापीठें व राज्यकारभार या व्यतिरिक्त इतरत्र जें इंग्रजीचें प्रस्थ अगदीं खेडयापाडयांपर्यंत बोकाळलेलें दिसत आहे तें नष्ट करून तेथें देशी भाषा मानानें अधिष्ठित करण्याच्या दृष्टीनें ही मंडळी कोणते प्रयत्न करीत आहेत ? कोणतीहि देशीभाषा न जाणणारा एखादा परका इंग्रज माणूस अगदीं अचानक व अजा-








णतेपणानें या देशांत येऊन पडला व शहरोंशहरीं मोठमोठ्या रस्त्यांवरून भटकूं लागला तर त्याची काय कल्पना होईल ? आपण भारत नांवाच्या कोणाएका देशांत नसून खुद्द इंग्लंडमध्येंच आहोंत असें त्यास निश्चितपणें वाटेल. रस्त्यांची शेंकडों नांवें व दुकानांच्या हजारों पाट्या, मोटारी; विमानें, आगगाड्या इत्यादींचे नंबर व नांवें फार काय दवाखाने, रुग्णालयें व वकीलांच्या नांवाच्या पाट्या व इतर बारीकसारीक गोष्टी, तसेंच या देशांतील कारखान्यांत संपूर्णतः उत्पादन झालेल्या मालाचीं नांवें व वर्णनें; निरनिराळया कंपन्यांचीं नांवें व दप्तरें; दुकानांतून मिळणाऱ्या पावत्या, कॅलेंडरें इत्यादि बहुतेक सर्वच इंग्रजींतून असल्यानें या देशाची म्हणून कांहीं भाषा आहे कीं नाहीं याबद्दल तो संभ्रमावस्थेंतच पडेल यांत शंका नाहीं. बरें, हीं सर्वच नांवें कांहीं पूर्वीची राजवट असतांना आलेलीं नाहींत. त्यांतील कित्येक अगदीं राजकीय स्वातंत्र्यांत जन्माला आलेलीं आहेत. अशा स्थितींत ही मंडळी आपले मोर्चे तिकडे कां वळवीत नाहींत ? विद्यापीठांतील बोधभाषा अगर राज्यकारभाराची भाषा एकदम चुटकीसरशी बदलतां येत नाहीं व समजा तशी बदलली तर कार्यनाश होईल असें म्हणण्यांत थोडाफार तरी वाव आहे. पण उपर्युक्त बाबतींत तर तसा कांहीं प्रकार नाहीं ना ? मग तिकडे थोडा दृष्टिक्षेप कां करीत नाहीं ? ही निष्क्रियता म्हणजे खऱ्या पोटतिडिकेचा अभाव असें कोणी म्हटल्यास त्यावर या मंडळींचें काय उत्तर आहे ? सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं देशी भाषांच्या अभिमानाचा उठल्या सुटल्या जप करण्यांत कांहीं स्वारस्य नाहीं. हा अभिमान कार्यान्वित करण्यास विद्यापीठांबाहेरहि पुष्कळ क्षेत्र आहे व त्यांत शक्ति खर्च केल्यासहि देशी भाषेची सेवा केल्याचें पुण्य पदरीं पडण्यासारखें आहे. आज परिस्थिति अशी आहे कीं एकीकडे देशी भाषांच्या नांवानें हैदोसदुल्ला चालू असतांनाच या भाषेंत, क्रमिक पुस्तकांच्या यादींत न बसणारा, शास्त्रीय स्वरूपाचा ग्रंथ कोणी लिहिल्यास तो प्रकाशित होण्यांतच केवढी तरी अडचण पडते. व प्रसिद्ध झाल्यावर प्रकाशनाचा खर्च भरून निघणें मुष्किलीचें होतें. ग्रंथकर्त्याच्या श्रमाच्या मोबदल्याची गोष्ट त्यानंतर. शास्त्रीय स्वरूपाचे अभ्यासपूर्ण लेख प्रसिद्ध करण्याच्या प्रतिज्ञेनें जन्मास आलेलीं ' नवभारता ' सारखीं मासिकें चालविणेंहि त्याचमुळें आर्थिकदृष्ट्या मोठ्या जिकीरीचें होऊन बसतें. भाषाभिमान्यांनीं इकडे लक्ष दिल्यास विधायक व भरीव स्वरूपाचें कितीतरी कार्य होऊं शकेल. निवळ घोषणांपलीकडे जाऊन प्रत्यक्ष कार्य करण्याची तळमळ मात्र पाहिजे. पाश्चात्य देशांत अशा कार्यासाठीं म्हणूनच कितीतरी संस्था असून त्यांचे व्यापहि विस्तृत आहेत. आपल्याकडे अशा संस्थांची संख्या कितीशी भेटेल ? याबद्दल कोणास दोष देण्याचा हेतु नसून आत्मसंशोधन करण्याच्या हेतूनेंच हा उल्लेख केला आहे. इतकें वाचकांनीं कृपया लक्षांत घ्यावें ही विनंति करून हा लेख पुरा करतों.

---

## गांवोगांव विश्व-विद्यालय

प्रत्येक खेड्यांत विद्यापीठ असायला हवें. ' ग्रामे ग्रामे विश्व-विद्यापीठम् ' हें आहे खरें ग्रामराज्य. कुणी मला म्हणाले, "खेड्यांत प्राथमिक शाळा असाव्यात, मोठ्या गांवांत हायस्कुलें असावींत आणि ( विशाखापट्टणसारख्या ) मोठ्या शहरांत कॉलेजें असावीं." मी म्हटलें, " ईश्वराची योजना अशी असती तर खेड्यांत दहा वर्षें वयापर्यंतचे लोक रहात असते, पंधरा वीस वर्षांपर्यंतचे लोक मोठ्या गांवांत राहते आणि त्याहून अधिक वयाचे लोक विशाखापट्टणसारख्या शहरांत राहते. पण जन्मापासून मरेपर्यंतचा लोकांचा व्यवहार जर गांवांतच चालतो; तर पुरें शिक्षण, पूर्ण विद्या, गांवांत कां चालू नये ? एका एका प्रांतांत एक एक युनिवर्सिटी स्थापन करण्याची योजना हे लोक करीत आहेत. किती दरिद्री आहेत हे लोक !

—विनोबा

प्रा. डॉ. ग. ना. जोशी

# आचार्य जावडेकर यांचें जीवन-तत्त्वज्ञान[1]

आधुनिक भारताच्या सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक जीवनाचें व क्रांतीचें सखोल चिन्तन करून तिला विशिष्टप्रकारचें वैचारिक व तात्त्विक अधिष्ठान देण्याचा अव्याहतपणें ज्यांनीं प्रयत्न केला, व म्हणून एका विशिष्ट अर्थानें महाराष्ट्राच्या जीवनांत जे आधुनिक भारताचे शिल्पकार ठरले, अशा आचार्य जावडेकरांच्या स्मृतिनिमित्तानें त्यांच्याच तत्त्वज्ञानविषयक विचारांची पहिली व्याख्यानमाला गुंफण्याची जावडेकर स्मारकसमितीच्या व्यवस्थापकांनीं मला ही जी अपूर्व संधि दिली तिच्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. मला आचार्य जावडेकरांच्या विचारांचा परिश्रमपूर्वक सूक्ष्म व सखोल अभ्यास करण्यास पुरेसा अवधि व स्वास्थ्य मिळूं न शकल्यानें त्यांच्या जीवनदर्शनाचें सम्यक् व समाधानकारक दर्शन आज घडवितां येणें शक्य नाहीं याबद्दल मी दिलगीर आहे. तथापि त्यांच्या विचारांचें आस्थेनें परिशीलन करीत असतांना त्यांच्या विचारांचा महत्त्वाचा गाभा म्हणून मला जो वाटला तो मी आज आपणांपुढें मांडीत आहे. मला पुढें आणखी स्वास्थ्य व अवधि सांपडल्यास आचार्यांच्या विचारधनाचें अधिक पद्धतशीर, सूक्ष्म, सखोल व शास्त्रीयपद्धतीनें परिशीलन व मूल्यमापन करण्याची मात्र माझी इच्छा आहे, आणि मला वाटतें मी एकट्यानेंच नव्हे तर आपणांपैकीं बऱ्याच अभ्यासूंनीं हें काम करण्यासारखें आहे हें निश्चित. आचार्यांचें लिखाण मौलिक स्वरूपाचें आहे यांत शंका नाहीं. आचार्य हे केवळ अमूर्त तत्त्वचिंतन करणारे ज्ञानसाधक नव्हते, तर प्रत्यक्ष राष्ट्रीय आंदोलनामध्यें अत्यंत आस्थेनें त्यांनीं स्वतः भाग घेतला होता व वृत्तपत्रसंपादनाचें टिळक-आगरकरांसारखें कार्य स्वतः ते करीत होते, व त्यामागें लोकजागृतीचें महत्त्वाचें कार्य त्यांनीं कित्येक वर्षें केलें. त्यामुळें समाजाच्या प्रत्यक्ष जीवनाशीं त्यांना निकटचा संबंध ठेवतां आला. त्यांच्याजवळ जशी चिन्तनशीलता व तत्त्वचिंतकता होती तशी कृतिप्रवणताहि होती. आचार्यांना रानडे-टिळक-आगरकर यांचा निःस्वार्थ समाजसेवेचा अमोल वारसा मिळलेला होता, व त्यांचेंच कार्य ते पुढें चालवीत राहिले. आचार्यांचा पिंड समाजाभिमुख वृत्तीचा असल्यानें लोकजागृति व लोककल्याण यांना त्यांनीं आपल्या विचारांत महत्त्वाचें स्थान दिलें होतें.

## आचार्यांचें जीवन-तत्त्वज्ञान

आचार्यांच्या ज्ञानाच्या व कृतीच्या कक्षेंत केवळ आंदोलनात्मक राजकारणच येत नव्हतें, तर इतिहास, धर्म, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, साहित्य अशा सर्व गोष्टींचा समावेश त्यांच्या सर्वस्पर्शी तत्त्वज्ञानांत झालेला सांपडतो. आपल्या सर्व विचार व आचारांच्या मागें एक व्यापक व स्थिर जीवन-तत्त्वज्ञान असलें पाहिजे, विशिष्ट दृष्टिकोन असला पाहिजे, त्याशिवाय आपल्या आचारविचारांना सुसंगतता व संवादितता येणें शक्य नाहीं अशी त्यांची श्रद्धा होती. प्लेटो, रूसो व गांधीजी यांना स्वतःचें कांहीं तत्त्वज्ञान होतें, त्याचप्रमाणें आचार्यांनींहि स्वतःसाठीं

१ आ. जावडेकर यांच्या द्वितीय पुण्यतिथिनिमित्त ता. ८,९,१० डिसेंबर रोजीं टिळकविद्यापीठ वाड्यांतील सभागृहांत प्रा. दि. के. बेडेकर यांनीं दिलेल्या तीन भाषणांचा गोषवारा.



अनुक्रमणिका






असें जीवन-तत्त्वज्ञान बनविलें होतें व तें त्यांच्या सर्वविचारांचें, श्रद्धांचें व कृतींचें स्थिर असें अधिष्ठान होतें. आज मी त्यांच्या एकंदर जीवन-निष्ठेबद्दल किंवा जीवन-तत्त्वज्ञानासंबंधीं बोलणार आहे. त्यांच्या विचारप्रणालीला मी केवळ 'दर्शन' हा शब्द योजीत नाहीं. कारण 'दर्शन' या शब्दानें भारतीय 'दर्शनांचा' विचार मनांत येणें संभवनीय आहे. आचार्यांचें जीवन-तत्त्वज्ञान अनेक व विविध तत्त्वज्ञानांतील सत्यांश घेऊन व त्यांचा समन्वय घडवून आचार्यांनीं तयार केलेलें आहे; आणि तें त्यांच्या राजकीय, सामाजिक किंवा तत्त्वज्ञानविषयक विचारांना बीजरूपानें कारणीभूत होतें.

आचार्यांची वृत्ति कांहींशी संशोधकासारखी होती. तेनसिंग हिलेरी यांना सभोंवतालीं केवळ बर्फ व वर आकाश यांनीं वेढलेलें असतांना एका-पेक्षां एक उत्तुंग अशीं आह्वान देणारीं शिखरें चढत असतांना कोणता अनुभव प्रत्यक्षांत अनुभवा-यला मिळाला असेल हें आपणांसारख्या सपाटीवर वावरणाऱ्या माणसांना कळणें कठीण आहे. त्याचप्रमाणें आचार्य हे जन्मभर अशा विचारशिखरांचा शोध करण्यांत गढून गेले होते. विचारांच्या क्षेत्रांत आदर्शाचें हें संशोधन करीत असतांना त्यांना कोणते अनुभव आले हें आपणांस कळणें कठीण आहे. तथापि त्यांनीं आपले अनुभव व विचार शब्दांत ग्रथित करून ठेवले आहेत ते वाचून आपणांस कोणत्या पद्धतीनें त्यांनीं विचारांचे टप्पे घेतले याचा फक्त मागोवाच घेतां येणें शक्य आहे.

## वैचारिक जीवनांतील अढळ स्थान

आचार्य जावडेकर हे महाराष्ट्रांतील केवळ एक विचारवंतच होते असें मानणें बरोबर नाहीं. राज-कारणाव्यतिरिक्तहि विचारांच्या इतर क्षेत्रांतहि ओसंडणारी जी समाजक्रांतीची कल्पना आहे तिच्या-संबंधीहि त्यांनीं फार मोठा मोलाचा विचार केलेला आहे. आणखी वीसपंचवीस वर्षांनीं समाजक्रांतीचा किंवा राजकीय वा राष्ट्रीयक्रांतीचा इतिहास लिहिला जाईल तेव्हां विचारांच्या क्षेत्रांतील आचार्यांचें स्थान कोणतें आहे हें स्पष्टपणें पहावयास मिळेल. आचार्य जावडेकरांना असे मोलाचे विचार मांडणें शक्य झालें व इतर प्रांतांतील विचारवंतांना शक्य झालें नाहीं असें म्हणतांना त्यांत महाराष्ट्राविषयींचा अभिमान नाहीं, तर त्याला कारण कांहीं विशिष्ट परिस्थिति होती; ती कशी हें थोडक्यांत मांडतों.

भारताच्या नव्या राष्ट्रीय घटनेमध्यें रचना करण्याचा किंवा विचार मांडण्याचा जो प्रश्न पुढें आला त्याचें प्राथमिक स्वरूप १८९५ सालापर्यंत व्यक्त झालेलें दिसतें असें मी मानतों. १८९५ ते १९२० पर्यंतच्या टिळकयुगाचें महत्त्व फार मोठें आहे. या पंचवीस वर्षांतील म्हणजे राष्ट्राच्या तारुण्यांतील काळांत भारत 'प्रौढराष्ट्र' या पदवीला जरी पूर्णपणें पोहोंचला नव्हता तरी राष्ट्रीयत्वाच्या एका विशिष्ट अवस्थेला ज्याला इतिहासाचार्य राजवाडे 'बालराष्ट्र' असा शब्द वापरीत होते, त्या अवस्थेला पोहोंचला होता आणि नेमक्या याच काळांत सबंध भारताच्या विचारांचा व कांहीं अंशीं कृतींचा पिंड घडत गेला व पुढें मग महात्मा गांधींची चळवळ होऊं शकली. ही घडण बीजरूपानें महाराष्ट्रांत घडत गेली आणि हिचें खरें स्वरूप महाराष्ट्रांशीं जे अत्यंत निगडित होते त्यांनाच कळूं शकेल. महाराष्ट्र-बाहेरील विचारवंतांना तें यथार्थपणें समजणें कठीण आहे. कारण टिळकांची भूमिका काय होती हें यथार्थपणें कळण्यासाठीं आगर-करांची भूमिका कळणें आवश्यक आहे, व त्यासाठीं महाराष्ट्रांतच जन्म घेतला पाहिजे. आगरकरांचें सर्व लिखाण मराठींतच आहे. ही संधि आ. जावडेकरांना मिळाली होती व तिचा उपयोग करून घेण्याइतकी प्रतिभा त्यांच्याजवळ असल्यानें त्यांनीं या पंचवीस वर्षांतील घटनांचा व विचारांचा सांगो-



अनुक्रमणिका






पांग अभ्यास केला होता. त्यांनीं जेव्हां हें इंग्रजींत सारूपानें लिहिलें तेव्हां अशातऱ्हेचें विश्लेषण आम्हांला करतां येणार नाहीं अशी कबुली उत्तर भारतीयांनीं तें वाचल्यावर दिली.

आचार्यांच्या विचारांत एकीकडे अत्यंत मूलग्राही तत्त्वाकडे जाण्याची प्रवृत्ति सतत दिसते तर दुसरीकडे हीं तत्त्वें आकाशांत तरंगणारीं न ठेवतां तीं सामान्य माणसाच्या जीवनाला कलाटणी देण्यास उपयुक्त साधनेंहि ठरलीं पाहिजेत व तीं वृत्तपत्रांतून लोकशिक्षण व लोकजागृति करीत राहून समाजांत प्रसृत केलीं पाहिजेत अशी त्यांची श्रद्धा होती. आज (१) त्यांचे राजकीय व राजकारणाशीं निगडित असलेल्या समाजक्रांतीच्या विचारपरंपरेंतील विचार आणि (२) राजकारण व समाजकारण यांच्या बुडाशीं असणारा शुद्ध विचार यांचाच प्रामुख्यानें विचार करावयाचा आहे. आचार्यांनीं समाजाच्या वर्तमानकालीन गरजा ओळखून व भूतकालीन व वर्तमानकालीन विचारांचा एकत्र आढावा घेऊन एक मूलसूत्र तयार केलें व त्याला आपल्या जीवन-दर्शनाचें स्वरूप दिलें. त्यांच्या जीवनतत्त्वज्ञानाचें स्वरूप खालील तीन सूत्रांत मांडतां येईल. (१) आधुनिक भारतीयत्व (२) अध्यात्मनिष्ठा (३) समन्वयदृष्टि.

## आधुनिक भारतीय

प्रथमतः ते आधुनिक भारतीय होते या म्हणण्याचा अर्थ असा, ते आधुनिक तर होतेच पण भारतीय पण होते. म्हणजे आधुनिकता स्वीकारतांना त्यांनीं आपल्या भारतीयत्वाचा त्याग केला नाहीं. अमेरिकेंतील रेड इंडियन लोकांप्रमाणें भारतांत परिस्थिति नव्हती, कारण रेड इन्डियन लोकांची मूळ संस्कृति व नवीन युरोपियनांची संस्कृति यांच्यांत मेळ बसणें शक्य नव्हतें. त्यामुळें रेड इन्डियन्सचा नाश होणें अपरिहार्य झालें. परंतु भारतांत ब्रिटिशांचें राज्य स्थिर झालें तेव्हां ब्रिटिशांच्या आधुनिक विचारांपुढें प्राचीन भारतीय विचारांचा किंवा संस्कृतीचा नाश होणें सोपें व शक्य नव्हतें. उलट या दोन विचारांच्या संघर्षांतून विचारांचा संकर व नवविचारांची निर्मिति होणें अपरिहार्य झालें. तेव्हांपासूनच —म्हणजे राजा राममोहनरॉय यांच्या कालापासून आधुनिकत्व आपल्याला अटळ झालें, व केवळ आतांच नव्हे तर भविष्यकाळींहि, भारताला हें आधुनिकत्व टाळून चालणार नाहीं.

१८९५ ते १९२० ह्या काळांत ज्या घटना घडल्या त्या घटनांच्या पार्श्वभूमीवर आचार्यांच्या विचारांची दिशा ठरली, त्यांचा पिंड तयार झाला. जहाल व मवाळ, सुधारक व सनातनी यांच्या संघर्षांतून भावी समाजक्रान्तीला दिशा लागत होती. पुढें त्यांच्यामध्यें तट पडले. एकपक्ष भारताचें राष्ट्रीय स्वातंत्र्य आधीं व तें अमुक एका साधनांनीं मिळविलें पाहिजे व त्यांत पूर्वकालीन गोष्टींचें सातत्य राहिले पाहिजे असें मानून राजकीय स्वातंत्र्यावर अधिक जोर देत होता, तर दुसरीकडें आगरकरांचा पक्ष राजकीय स्वातंत्र्याबरोबर समाजक्रांतिहि झाली पाहिजे असें मानत होता. या दोन विरोधी विचारसरणींनीं त्या कालीन महाराष्ट्राची भूमि भाजून निघाली होती, व अशा परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर जावडेकर विचार करूं लागले होते. या विचारसरणींतील सत्यासत्यतेचा विचार करीत असतांना त्यांना आधुनिक भारतीयत्वाचा साक्षात्कार झाला, व अखेरपर्यंत ही कल्पना त्यांच्या विचारांतून व्यक्त होत राहिली.

## अध्यात्मनिष्ठा

दुसरें सूत्र म्हणजे आचार्यांची अध्यात्म-निष्ठा सर्व विचारांना प्रेरणा देणारी 'अध्यात्मनिष्ठा' — हें एक अत्यंत महत्त्वाचें सूत्र जावडेकरांच्या विचारांना लाभलेलें आहे. सर्व प्रकारच्या कृतींना, मग त्या राजकीय स्वातंत्र्याच्या असोत कीं सामाजिक उन्नतीच्या असोत, प्रेरणा आध्यात्मिक असते असा











त्यांचा विश्वास होता. विचार व परिस्थिति हीं आपापल्या पद्धतीनें माणसाच्या कृतीवर परिणाम करीत असलीं तरी शेवटीं विचारच अधिक प्रभावी ठरतो, व तोच परिस्थितीचें विशिष्ट प्रकारें परिवर्तन करून त्याला दिशा लावीत असतो. म्हणून क्रांतींत विचारच अधिक मूलगामी व निर्णायक असतो असें ते मानीत. वास्तवाचा विचार करीत असतांना आदर्शांचें व मूल्यांचेंहि सतत भान ठेविलें पाहिजे यावर त्यांचा कटाक्ष होता. आदर्शांना व मूल्यांना ते निर्णायक महत्त्व देत. त्यांच्या मतें मानवी आदर्शांचें मूळ मानवी मनांतील एका सनातन आत्मप्रेरणेंत व धर्मभावनेंत आहे व या प्रेरणेंतून शुद्ध सत्यान्वेषक बुद्धि, शुद्धप्रेम, बंधुभाव आणि शुद्ध सात्त्विक, द्वेषरहित क्रांतिकारक वृत्ति यांची सतत निर्मिति चालत असून तिच्यामुळें मानवी संस्कृतीची घडण होत गेली आहे असें ते मानतात. एकांगी वास्तववादी दृष्टि व एकांगी अध्यात्मवाद या दोघांवरहि टीका करून त्या दोघांना योग्य तेवढें महत्त्व देऊन आपले विचार व आचार आध्यात्मिकतेच्या बळकट पायावर उभारले पाहिजेत असें त्यांनीं प्रतिपादिलें.

## समन्वयदृष्टि

आचार्यांची समन्वयदृष्टि ही देवाणघेवाण पद्धतीची नव्हती. आचार्य भागवतांनीं त्यांच्या समन्वयदृष्टीचें फारच सुंदर विवेचन केलें आहे. सामान्यत: समन्वय म्हणजे 'भांडण नको, मला न पटणाऱ्या तुझ्या कांहीं गोष्टी मी स्वीकारतों; तुला न पटणाऱ्या कांहीं गोष्टी तूं मजपासून घे' अशा अर्थानें समन्वय शब्द वापरला जातो. परंतु आचार्यांना हा शब्द अशा अर्थानें अभिप्रेत नाहीं. त्यांनी 'समन्वय' हा शब्द निषिद्ध मानला नाहीं. परंतु त्यांच्या 'समन्वय' या शब्दामागील अभिप्रेत अर्थ हेगेल व मार्क्स यांच्या तत्त्वज्ञानाच्या आधारानें घेतला असल्याचें दिसून येईल. यांत 'पूर्वपक्ष' व 'उत्तरपक्ष' यांतील कांहीं चांगल्या गोष्टी घेऊन त्यांचें एकत्व निर्माण करण्याचा प्रयत्न केला जातो. यांत भांडणाला प्रवृत्त झालेल्या विचारसरणींतील अतिरेकाचे दोष टाळून त्यांतील सत्य किंवा सत्यांश एकत्र आणण्याचा व नवें सत्य बनविण्याचा प्रयत्न केला जात असतो. पाश्चात्यांच्या प्रभावी संस्कृतीत व विचारसरणींतहि कांहीं मोलाचे विचार असूं शकतील, व ते आत्मसात् केल्याशिवाय, व त्यांची जोड प्राचीन भारतीय विचारांना दिल्याशिवाय, आपला विचार जिवंत व आचरणीय ठरणार नाहीं असा विचार करून आचार्य सर्वच द्वंद्वात्मक विचारांतील सदंश व सत्यांश एकत्र आणून त्यांचा समन्वय घडवूं पाहात होते. अर्थात् अशा समन्वयांत दोन विरोधी पक्षांतील कांहीं विचारांची यांत्रिक जुळणी निर्जीव रीतीनें केलेली नसते, तर त्या समन्वयांतून कांहीं नवें सत्य उगम पावत असतें. विविध विचारप्रणालींतील सार काढीत जाऊन त्यांना एकत्र गुंफून जर त्यांतून सुसंवादी प्रणालि तयार करतां आली तर ती सर्व प्रणालींतील अतिरेकीपणामुळें येणारे दोष काढून टाकून एक निर्दोष, सुसंवादी अशी प्रणालि तयार होऊं शकते व ती पूर्वीच्या प्रणालींपेक्षां अधिक शुद्ध, श्रेष्ठ व व्यापक असूं शकते अशी आचार्यांची श्रद्धा होती. वास्तव व आदर्श, व्यक्तिवाद व समाजवाद, क्रांति व उत्क्रांति इत्यादि परस्परविरोधी वाटणाऱ्या विचारांचा व्यतिरेक बुद्धीनें स्वीकार न करतां त्यांच्यांतील सत्य व टिकाऊ भाग काढून घेऊन त्यांचा उच्चतर पातळीवर समन्वय करण्याची वृत्ति आचार्यांच्या विचारसरणींत दृढ झालेली होती. त्यामुळें त्यांची न्यायबुद्धि ते निरोगी व जागृत ठेवूं शकले व म्हणून प्राचीन भारतीय सांस्कृतिक व आध्यात्मिक मूल्यांचा वास्तववादी व विज्ञानप्रधान युरोपीय संस्कृतीशीं समन्वय करून अध्यात्मनिष्ठ व मूल्यग्राही राहूनहि वास्तवापासून दूर न जातां ऐहिक जीवन संपन्न, समृद्ध व वैभवशाली करण्यासाठीं झटूं शकले. आचार्यांच्या










आधुनिक भारताचा विचार त्यांच्या याच दृष्टींतून व वृत्तींतून निर्माण झाला आहे असें म्हणायला हरकत नाहीं.

## आचार्यांचें राजकीय तत्त्वज्ञान

आचार्यांच्या राजकीय विचारसरणीचे दोन भाग पडतात—

( १ ) राज्यसंस्थेच्या उदयाचा, कार्याचा व भवितव्याचा विचार. यांत व्यक्ति, वर्ग, राष्ट्र व सर्व मानवसमाज यांचा विचार होऊन पक्षोपक्षांचे व नागरिकांचे हक्क व कर्तव्यें व प्रतिकाराचीं साधनें आणि त्यांच्या मर्यादा यांची मीमांसा होते. आचार्य आत्मराज्यवाद किंवा अराज्यवादाचे पुरस्कर्ते होते.

(२) राजकारणाच्या विवेचनांत त्यांनीं पांच कालखंड पाडले. ब्रिटिशराज्य स्थिरावण्यापूर्वीची स्थिति व पारतंत्र्याचीं कारणें-आचार्यांनी भारत परतंत्र कसा झाला ह्याची मीमांसा करतांना असें सांगितलें आहे कीं, ब्रिटिश भारतांत आले व त्यांनीं जेव्हां या देशाचें शासनकार्य आपल्या हातीं हळुहळूं घेतलें तेव्हां राष्ट्रीयतेच्या कल्पनेचा भारतांत अभाव होता, व राजा व प्रजा यांच्यांत लागणाऱ्या एकात्मतेच्या भावनेची उणीव होती. केवळ विश्वासरावांना गोळी लागून ते पानीपतच्या लढाईंत पडले म्हणून मराठ्यांचा पराभव झाला, अशा प्रकारची इतिहासाची मीमांसा त्यांनीं केली नाहीं. शनवारवाड्यावर ब्रिटिशांचा बावटा लागला म्हणून नागरिक धावून आले नाहींत, कारण राष्ट्रीयत्वाच्या पाठीचा कणा त्यावेळीं नव्हता, व म्हणून ब्रिटिशांचें सुसंघटित राज्य येथें स्थिरावूं शकलें असें आचार्यांचें मत होतें. १८५७ च्या पहिल्या स्वातंत्र्ययुद्धांत सामान्य जनतेंत त्या लढ्याची तीव्रता व जाणीव नव्हती असें आचार्यांचें मत होतें. उलट सावरकरांचें मत ह्याच्या उलट होतें. या कालखंडांत बंगालनें भारताला नेतृत्व दिलें. मिशनऱ्यांच्या विरुद्ध झालेल्या महत्त्वपूर्ण लढ्याचा पाया देवेंद्रनाथांच्या वेळीं बंगालमध्यें १८९२ सालीं घातला गेला. त्याचें लोण नंतर ३० वर्षांनीं महाराष्ट्रांत आलें व मग लोकहितवादींसारखीं माणसें आपल्याकडे विचार करूं लागलीं. विशिष्ट प्रकारच्या सामाजिक चालीरीतीमुळें समाज पांगळा झाला होता व म्हणून त्याविरुद्ध चळवळ प्रथम बंगालमध्यें सुरू झाली.

## रानडे, आगरकर व टिळक

१८९५ ते १९२० हा महत्त्वाचा कालखंड होता व त्यांतच पुढील सर्व घटनांना वळण लागलें. या काळांत आचार्य म्हणतात त्याप्रमाणें रानडे, आगरकर व टिळक या तीन पिंडांच्या कर्तृत्ववान् प्रतिनिधींच्या द्वारां तीन प्रकारच्या प्रवृत्ति महाराष्ट्रांत एकमेकाशीं झगडत होत्या. आचार्यांना या तिघांहि विषयीं आदर होता व म्हणून या तिघांनाहि ते महाराष्ट्राचे—नव्हे पर्यायानें भारताचे शिल्पकार अशी पदवी आचार्यांनीं दिली आहे. रानडे हे प्रागतिक असले तरी आपल्या प्रकृतिधर्माप्रमाणें सनदशीर राजकारण करीत होते असें आचार्यांचें म्हणणें आहे. परंतु त्यांच्या विशिष्ट मत व कार्यपद्धतीला त्यांचा प्रकृतिधर्म जबाबदार होता असें मानणें बरोबर नाहीं. रानड्यांचा इंग्रजांना चांगलें म्हणण्यांत भोंगळपणा नव्हता, कारण रानड्यांच्या काळांत ब्रिटिशसत्तेनें साम्राज्यवादी रूप धारण केलें नव्हतें. त्यांचा ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवर विश्वास होता व तसा अनुभव त्यावेळीं लोकांना येतहि होता. त्यामुळें रानड्यांना केवळ मवाळ म्हणून दोष देतां कामा नये. कारण लो. टिळक व गांधीजी यांचाहि ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवर विश्वास होता. टिळकांची स्वराज्याची चळवळ व गांधीजींची असहकाराची चळवळ यांच्या बुडाशींहि हेंच गृहीततत्त्व होतें. असहकाराला बऱ्याच काळानंतर कायदेभंगाचें रूप मिळालें.

रानडे व आगरकर हे एकाच विचारसरणीचे असून टिळक हे त्यांच्यापेक्षां वेगळे असें समजलें

जात असे. परंतु हें बरोबर नाहीं. टिळक व आगरकर हे दोघेहि रानड्यांच्या नंतरच्या पिढींतील होते, व दोघेहि जहाल होते. त्यांच्यांतील विरोधांचें व मतभेदाचें विवेचन आचार्यांनीं आधुनिक भारतांत केलें आहे. त्या दोहोंतील मुख्य विरोध टिळक हे व्यक्तिस्वातंत्र्यवादी नव्हते, व आगरकर हे व्यक्तिस्वातंत्र्यवादी होते, असा दाखविला आहे. आगरकर हे सर्वांगीण सुधारणावादी होते, सबंध समाजाचें परिवर्तन अमुक एका दिशेनें झालें पाहिजे, व राजकीय स्वातंत्र्य हा त्याचा एक भाग मानला गेला पाहिजे, हें आगरकरांचें मूलभूत तत्त्व होतें. हाच त्यांचा व्यक्तिस्वातंत्र्यवाद असावा असें आचार्यांच्या विवेचनावरून वाटतें. आगरकर हे व्यक्तिस्वातंत्र्यवादी होते तसे टिळकहि होते. व्यक्तिस्वातंत्र्य हें मूल्य सर्वांनींच मान्य केलें होतें. परंतु व्यक्तिस्वातंत्र्यवाद मान्य करतांना आगरकरांना व्यक्तिपरता मान्य नव्हती. ते स्पेन्सरवादी असूनहि 'जो राज्यसंस्थेची दखल घेत नाहीं असा स्पेन्सर मला मान्य नाहीं' असें त्यांनीं स्वच्छपणें सांगितलें आहे. आगरकरांच्या लेखांतून समाजवादी विचारसरणी व्यक्त झालेली दिसते. त्यांनीं व्यक्ति व समाजपरिवर्तन यांचा खूपच विचार केलेला दिसतो. आचार्यांनीं आगरकरांच्या या भूमिका अधिक स्पष्ट केल्या असत्या तर फार बरें झालें असतें. उलट टिळक हे कुशल राजकीय मुत्सद्दी होते. केवळ राजकीय स्वातंत्र्यावरच समाजाचें लक्ष केंद्रित केलें पाहिजे असें टिळकांचें मत होतें, व एक राजकीय मुत्सद्दी या नात्यानें त्यांचें तें मत बरोबर होतें असा निर्वाळा आचार्यांनीं दिला आहे. लोकमान्यांनीं राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं एक संघटित शक्ति निर्माण केली हें सांगतांना आगरकर व्यक्तिस्वातंत्र्यवादी होते म्हणून मागें पडले ही भूमिका केवळ टिळकांच्या समर्थनामुळें घेतली गेली असावी. लोकमान्यांनीं जातिभेदांवर आघात करणारांवर आघात केलेले आहेत ह्याचें विवेचन अधिक व्हावयास हवें होतें.

## १९२० नंतरचा काळ

१९२० नंतरचा काळ हा आचार्यांचा स्वतःच्या कर्तृत्वाचा काळ आहे. या काळांत ते केवळ इतिहाससमीमांसक न राहतां इतिहासाची प्रत्यक्ष घडण करणाऱ्याची त्यांची भूमिका होती. महाराष्ट्रांत गांधीवादाला स्थिर तात्त्विक पायावर उभें करण्याचें श्रेय आ. जावडेकरांनाच द्यावयास पाहिजे. ते गांधीवादी होते पण व्यक्तिपूजक नव्हते. १९२० ते ३० या काळांतहि ते गांधीवादाशीं संपूर्णपणें समरस झाले नव्हते. १९२८ सालीं 'विश्वकुटुंबवाद' हें पुस्तक त्यांनीं लिहिलें. त्यावरून ते कै. वामन मल्हार जोशी यांच्यासारखे विचारांचे संशोधक होते हें स्पष्ट होतें. ते कोणत्याहि एका विचारसरणीशीं पूर्णपणें समरस झाले नव्हते. गांधीवादाला सुद्धां पुरेसा बौद्धिक आधार दिल्याशिवाय ते मांडत नसत. टिळकानंतर महाराष्ट्रांत अशा रीतीनें गांधीवाद रुजविण्याचें कठीण काम आ. जावडेकरच करूं शकले.

१९३० नंतरच्या काळांत गांधीवादास समाजवादाचें रूप आलें. आचार्य या वादाशीं प्रत्यक्षपणें समरस झाले. राष्ट्रीय क्रांति ही केवळ गांधीवादामुळें पुढें जाऊं शकत नाहीं तर गांधीवाद व समाजवाद यांतील सत्यांश घेऊन त्यांचा समन्वय साधला पाहिजे अशी भूमिका त्यांनी घेतली. गांधीवादांतील साधनशुचितेसंबंधीचा आग्रह त्यांना मान्य होता. भारताला केवळ पारतंत्र्यांतून स्वातंत्र्यांकडे जावयाचें होतें असें नाहीं तर संपूर्ण समाजपरिवर्तन केलें पाहिजे. ह्याची त्यांना जाणीव झाली होती.

## विचारांतील फेरफार

आचार्य अनेक वेळां विचारांत फेरफार करतांना आढळतात. १९५० नंतर आचार्य एकतऱ्हेच्या धर्मसंकटांत सांपडल्याचें आढळतात. त्यांना समाज-

वादाचे बाबतींत इतर देशांत– सोव्हिएट युनियन-मध्यें प्रत्यक्ष व्यवहारांत कांहींतरी चुकतें आहे असें आढळून आलें. कॉंग्रेस सत्ताधारी झाल्यावर तिच्यांत त्यांना अधिक दोष आढळून आले व त्यामुळें ते अधिक विषण्ण बनले. राष्ट्रवाद, गांधीवाद, प्रत्यक्ष कॉंग्रेस पक्ष, हिंदुस्थानांतील कम्युनिस्ट पक्ष, व मार्क्स-वादाचा प्रत्यक्ष व्यवहार यांच्या प्रत्यक्ष दर्शनानें त्यांना व्याकुळता आली. परंतु आचार्य निराश न होणारे होते. ते नवीन प्रयत्न करीत राहिले. ते विचारांची नवीन मांडणी करीत राहिले. पुढच्या काळांत ते समाजवादी पक्षाच्या जास्त जास्त जवळ येऊं लागले. कॉंग्रेसपक्ष व समाजवादीपक्ष यापैकीं समाजवादीपक्ष सत्तेवर यावा असें त्यांना वाटूं लागलें. नवीन भारतांत सत्ताधारी पक्ष म्हणून समाजवादी व सत्ता-कांक्षी पक्ष म्हणून म्हणजे विरोधीपक्ष म्हणून कॉंग्रेसपक्ष असावा. इतर कोणत्याहि पक्षाला आचा-र्यांच्यामतें सत्ताकांक्षी होण्याचाहि अधिकार नाहीं. आचार्यांच्या मतें सत्ताधारी व सत्ताकांक्षी पक्षांवर अंकुश चालविण्यास समर्थ अशी तिसरी प्रबळ शक्ति असावी. अशा या उच्च नैतिक व आध्या-त्मिक शक्तीचें संगोपन व संवर्धन आज भूदानयज्ञा-च्या रूपानें विनोबा करीत आहेत. असें ते मानीत.

आचार्य जावडेकर शेवटीं शासनमुक्त किंवा अराज्यवादी समाज हें ध्येय मानत असले तरी त्यांच्या मतें राज्यसंस्था ही समाजधारणेला कांहीं काळ आवश्यक असून तिचें कार्य कमींत कमी हिंसक पद्धतीनें व लोकशाही पद्धतीनें चालावें, असें त्यांना वाटते. व्यवहार्यतेच्या दृष्टीनें लोक-शाहीला पोषक व आधारभूत अशा राज्यसंस्थेची आवश्यकता त्यांना मान्य होती. पण अशा राज्य-संस्थेचें नियंत्रण करणारी एक आध्यात्मिक शक्ति असावी असाहि त्यांचा आग्रह होता. त्यांच्या राजकीय तत्त्वज्ञानाचा मुख्य गाभा या नियंत्रक अध्यात्मशक्तीच्या कल्पनेंतच आहे. त्यांच्या मतें डार्विनच्या सिद्धान्तामुळें युरोपांतील अनिर्बंध स्पर्धे-च्या तत्त्वाला तात्त्विक आधार मिळाला. परंतु टॉल-स्टॉय किंवा क्रोपोट्किन यांच्या मतें व्यक्तीचा विकास जीवनकलहांतून होणारा नसून तो मानवां-तील प्रेम व सहकार्य यांतून होणारा आहे. आचा-र्यांना हें तत्त्व मान्य होतें. प्राचीन भारतीय राज्य-सत्तेवर ऋषींच्या व राजधर्माच्या अध्यात्मसत्तेचें नियंत्रण होतें. आणि राजा निरंकुश असला तरी तो ग्रामीण कारभारांत प्रत्यक्ष हस्तक्षेप करीत नसे. तशीच कांहींशीं नियंत्रित राज्यसंस्थेची कल्पना आचार्यांना अभिप्रेत होती. तरी पण त्यांचा आदर्श समाज शासनमुक्त असावा असें त्यांना वाटे. ख्रिस्तानें म्हटल्याप्रमाणें ‘ भूतलावरील ईश्वरी राज्य ’, तसेंच टॉलस्टॉय, क्रोपोट्किन प्रभृतींनीं आणि मार्क्सनेंहि ध्येयरूप मानलेली राज्यहीन, वर्गहीन मुक्त मानव-समाजाची स्थिति त्यांना आदर्श म्हणून मान्य होती. आ. विनोबांनींहि या शासनमुक्त स्थितींचेंच ध्येय मान्य केलें आहे. तिचें अधिष्ठान मानवाच्या सना-तन आत्मप्रेरणेंत असल्यामुळें त्या स्थितींला ‘ आत्म-राज्याची आदर्श समाजस्थिति ’ हें नांव आचार्यांनीं दिलें आहे. असें असलें तरी आचार्य स्वप्नवादी नव्हते. त्यांच्या मतें समाजवादीपक्षानें समाजवादाचें ध्येय साकारकरण्यासाठीं अधिकारावर यावें, व जेव्हां अशा शबल सत्याग्रही समाजवाद्यांचा पक्ष भारतांत नांदूं लागेल तेव्हां त्याला शुद्ध सत्तानिरपेक्ष सर्वोदयवादी व्यक्तींचें मार्गदर्शन लाभेल, व त्यावेळीं आत्मराज्याच्या ध्येयाच्या जवळ भारताला जातां येऊन त्या दिशेनें भारतीय समाजवादाला जगाचें मार्गदर्शन करतां येईल, असा आशावाद आचा-र्यांनीं व्यक्त केला आहे.

विकेंद्रित समाजरचनेवर त्यांचा विश्वास होता. पूर्वीच्या शतकानुशतकें विकेंद्रित असलेल्या भारतीय समाजाचें पुनरुज्जीवन होणार आहे अशी त्यांची श्रद्धा होती. शेवटीं विकेंद्रित समाजाची अवस्थासुद्धां अपूर्ण

आहे असें सांगून त्यांनीं शासनमुक्त समाजाचें आग्रहानें प्रतिपादन केलें. ह्यालाच ते 'आत्मराज्य' म्हणतात. भूदान, संपत्तिदान, बुद्धिदान, श्रमदान वगैरेंच्या मार्गानें सर्व समाजांत स्वामित्वत्याग व संपत्तीचें विकेंद्रीकरण होईल. व त्याच मार्गानें समाज उन्नत व प्रगत होईल असें त्यांना वाटत होतें. त्यांच्या विकेंद्रीकरणाच्या विवेचनाला कांहींसें काल्पनिक स्वरूप आलेलें आहे. मात्र हें विकेंद्रीकरण कसें, कोणत्या मार्गानें, कोणत्या टप्प्यांनीं, कोणी व केव्हां करावयाचें, व तें कसें साध्य करतां येईल, व याविषयींच्या व्यावहारिक अडचणीहि कोणत्या, त्या लक्षांत घेऊन त्यांनीं अधिक तपशीलवार विवेचन केलें असतें तर बरें झालें असतें. कदाचित् पुढें त्यांनीं अशाप्रकारचें विवेचन केलेंहि असतें.

### तत्त्वज्ञानी जावडेकर

आचार्य जावडेकर तत्त्वज्ञानी होते का ? या प्रश्नाचें उत्तर देणें जरा कठीण आहे. आचार्य हे मूलग्राही विचार करणारे असल्यानें एका विशिष्ट अर्थानें ते तत्त्वज्ञानी होते. मात्र ते घटपटाचा किंवा ज्ञानाच्या स्वरूपाचा व ज्ञानप्रमाणांचा विचार करणारे तत्त्वज्ञ नव्हते. ते मूल्यांचा किंवा जीवन-मूल्यांचा विचार मात्र जरूर करीत असत. त्यांनीं तत्त्वज्ञानाच्या विचारांत कांहीं विशेष भर घातली का, असा प्रश्न विचारला असतां त्याचें सरळ उत्तर देणें कठीण आहे. त्यांची पद्धति कांहींशी सॉक्रेटिसाच्या विचारपद्धतीसारखी वाटते. त्यांची विचार-पद्धति चर्चात्मक होती, व त्यांच्या चर्चेंतून कांहीं निष्कर्ष उगम पावतात हें खरें. राजकीय क्षेत्रांतहि काम करीत असतांना कांहीं विशेष महत्त्वाचे प्रसंगीं राजकीय विचारवंतांचें मन व संपूर्ण जीवन ढवळून निघतें, त्यांच्या उत्कटत्वानें जगण्याच्या प्रयत्नांत त्यांच्या मनांत प्रबळ ऊर्मि उठतात, व त्यांतून कांहीं मूलग्राही विचारांचा जन्म होत असतो. आचार्य तसेंच उत्कटत्वानें जगणारे विचारवंत होते.

आचार्य अध्यात्मनिष्ठ होते. ते मोक्षधर्माचा विचार करणारे होते. परंतु पारंपरिक मोक्षकल्पनेपेक्षां त्यांची मोक्षाची कल्पना वेगळी होती. त्यांच्यामतें ऐहिक जीवन सुखी व समृद्ध बनवून तें श्रेष्ठ व उन्नत करणें हाच धर्मभावनेचा व मोक्षप्रवृत्तीचा खरा गाभा आहे. अर्थात् ऐहिक जीवनाची उन्नति करीत असतांना माणसानें कांहीं श्रेष्ठ आध्यात्मिक मूल्यांना जपलें पाहिजे, व त्या मूल्यांचा साक्षात्कार करून घेण्याच्या मार्गानेंच त्याच्या ऐहिककृति झाल्या पाहिजेत असा त्यांचा कटाक्ष होता. मोक्षाच्या पारंपरिक पारलौकिकता व संसारनिवृत्तीच्या कल्पना धर्मभावनेची विकृति आहे असें आचार्यांचें मत आहे. प्राचीन मोक्षकल्पनेच्या परीघातून बाहेर पडूनहि त्यांनीं त्याच्याशीं स्पर्श ठेवला होता. न्या. रानडे, लोकमान्य टिळक, गांधीजीं यांच्या मोक्षाच्या कल्पनेशीं जावडेकरांचा विचार समान होता. आचार्यांच्यामतें मोक्ष म्हणजे संन्यास, निवृत्ति किंवा पलायनवाद नव्हे. लोकमान्यांप्रमाणेंच आचार्यांचा प्रवृत्तीचा किंवा निष्काम कर्माचा मार्ग होता.

### धर्मविचार

ख्रिश्चन मिशनऱ्यांचा व रानड्यांच्या प्रार्थना-समाजाच्या एकेश्वरवादापेक्षां आचार्यांचा धर्मविचार वेगळ्या स्वरूपाचा होता. आगरकर ऐहिक जीवनांत सुखवर्धन करणें व जीवनाला पूर्णतेकडे नेणें ही मानवाची आकांक्षा सत्य व इष्ट मानत होते, तरी ते स्वतः अज्ञेयवादी होते. आगरकरांचा ऐहिक सुखवर्धनाचा धर्म हाच खरा धर्म ही आगरकरांची भूमिका आचार्यांनीं स्वीकारली. सर्व मानवांमध्यें एक 'सनातन चैतन्यमय अध्यात्मवृत्ति' असून ती बुद्धि-प्रेम-सदाचार किंवा सत्य-अहिंसा-क्रांति यांची जननी आहे व मनुष्यांमधील हा सनातन चित्-अंश विश्वामधील ऋताचा ( किंवा नैतिक अवस्थेचा ) अंश आहे हा विचार आचार्यांना अभिप्रेत होता असें वाटतें. मानवाच्या हृदयांत ही











एक सनातन आत्मप्रेरणा किंवा धर्मप्रवृत्ति असते असा आचार्यांचा विश्वास होता. माणूल हा मुळांत म्हणजे त्याच्या शुद्ध स्वरूपांत चांगला व प्रेममय असतो ही श्रद्धा हिंदु व ख्रिश्चन धर्मांत सारखीच असलेली दिसते. ख्रिश्चन धर्म मनुष्याला ईश्वराचा पुत्र मानतो, व त्याचें मूळ स्वरूप मंगलमय व प्रेम-मय आहे असें मानतो. फ्रेंचराज्यक्रान्तीच्या आधीं व जरा नंतर ख्रिश्चनधर्माचें नियंत्रण नसतांनाहि रूसो यानें निसर्गतः मनुष्य शुद्ध असतो असेंच सांगितलें. आपल्याकडेहि हिंदुधर्मांत मनुष्याचें मन मूळअवस्थेंत शुद्ध व सात्त्विक असतें, परंतु नंतर तें मलिन बनतें व कामवासनांच्या किंवा षड्रिपूंच्या आहारीं गेल्यानें तें अशुद्ध व मलिन बनतें; व भगवद्भक्तीच्या मार्गानें किंवा संतसमागमानें मनुष्य पुनः शुद्ध व पवित्र होऊं शकतो अशी शिकवण सांपडते. आचार्यांच्या मतें प्रत्येक मनुष्यांत सनातन शुद्ध आत्मप्रेरणा असते व ती यथार्थ रीतीनें व्यक्त होऊं शकली तर समाजजीवन शुद्ध करतां येऊं शकतें असा त्यांचा विश्वास होता. आचार्यांनीं टिळकांचा निष्काम व अनासक्त कर्मयोग स्वीकारला, पण त्यांचें विवर्तवादाचें तत्त्वज्ञान मात्र त्यांना मान्य नव्हतें. ऐहिक सुखसंवर्धन, स्वातंत्र्य, न्याय, समता, शांतता या गोष्टींसाठीं धडपड कां करावयाची तर त्यांच्यामागें 'आत्मप्रेरणा' असते असें आचार्य मानतात.

## ऐहिकतेसाठीं अध्यात्म

एकूण आचार्यांच्या धर्मविषयक कल्पनेला पूर्ण ऐहिकतेचें अधिष्ठान असूनहि ती आगरकरांचा अज्ञेयवाद व मार्क्सचा भौतिकवाद यापेक्षां वेगळी आहे. तसेंच ती रानड्यांच्या एकेश्वरवादापेक्षां व टिळकांच्या ब्रह्मविद्यामूलक कर्मयोगापेक्षांहि वेगळी आहे. विवर्तवाद किंवा 'ईश्वरीसूत्रा'चा आधार त्यांनीं स्वीकारलेला नसून हेगेलचा वितर्कवाद (किंवा स्वयंगतिशील परिवर्तनवाद) त्यांनीं अंगीकारला आहे. त्यांच्यामतें मानवांतील चैतन्याची क्रमविकासानें व क्रांतीनें जी अभिव्यक्ति होत जाते, तिचें स्वरूप शांकरवेदान्तप्रणीत विवर्तवादानें समजूं शकत नाहीं. हेगेलच्या वितर्कवादा (Dialectics) चा आश्रय केल्यानेंच या अभिव्यक्तीचें स्वरूप कळूं शकेल. या अभिव्यक्तीच्या दृष्टीनें आचार्य मानवी-मनांतील सनातन-चिदंशाच्या आधारानें सर्व परिवर्तनाचा अर्थ लावतात. ह्या बाबतींत ते प्लेटोच्या आदर्शवादाचें व भारतीय गुणोत्कर्षाच्या तत्त्वाचें ग्रहण करतांना दिसतात. ऐहिकतेसाठीं अध्यात्म— ही आचार्यांच्या मनांतील आधुनिकता आहे. सामाजिक व राजकीय परिवर्तन करावयाचें असल तर तें भासमय किंवा विवर्तस्वरूपी मानून चालणार नाहीं. तें सत्य मानलें पाहिजे यासाठीं त्यांनीं शांकरतत्त्वज्ञानाचा त्याग केला. मानव हा मुळांत चांगला कीं वाईट आहे याविषयींचें कोडें वामन मल्हार जोशी यांनाहि शेवटपर्यंत सुटलें नाहीं. या विषयीं त्यांचें मत अनिश्चितच होतें. आचार्यांची यासंबंधींची भूमिका स्पष्ट होती असें वाटतें. अध्यात्माला वास्तववादाचा आधार देण्यासाठीं कोणतें तत्त्वज्ञान स्वीकारलें पाहिजे यावर आचार्यांनी खूपच विचार केला होता. अमुकच एक मत स्वीकारलें पाहिजे असें जसें वामन मल्हार मांडत असत तशीच आचार्यांचीहि मांडणी आहे. आचार्य हे एक प्रखर तत्त्वविचारी व तत्त्वविवेचक होते हें खरें. त्यामुळें त्यांच्यांत श्रद्धेचा अंश कमी सांपडतो.

आचार्यांनीं हेगेल, मार्क्स, गांधीजी, टॉलस्टॉय इत्यादींच्या तत्त्वज्ञानाचा सखोल अभ्यास केलेला होता.

मनुष्य मुळांत आत्मप्रेरणेनें भारलेला आहे हें तरी कशासाठीं मानावयाचें ? त्याला आधार कोणता ? मनुष्य मुळांत दुष्ट कीं सुष्ट हें स्पष्टपणानें ठरवितां येत नसल्यानें वामनराव जोशी संशयवादी बनले. मनुष्य मुळांत सत्यप्रेमी, ज्ञानप्रेमी प्रेममय आहे हें





अनुक्रमणिका

कशावरून ? हा एक भ्रमच आहे कीं काय ? आणि हा भ्रम कशासाठीं टिकवायचा असे प्रश्न साहजिकपणें उभे राहतात. खरें म्हणजे मनुष्याचें मन दुहेरी असत. तें अंशतः सुष्ट व अंशतः दुष्ट असतें. मनुष्य मुळांत म्हणजे त्याच्या मूल स्वरूपांत शुद्ध व सुष्ट असतो असें तरी कां व कसें मानावयाचें ? याविषयीं आचार्यांनीं स्पष्ट विवेचन केलेलें नाहीं. त्यांनीं ऐहिकतेवर भर दिला तरी ते ऐहिकतावादी किंवा सुखवादाचे पुरस्कर्ते मात्र नव्हते. आचार्यांनीं त्यांच्या समन्वयदृष्टीला अनुसरून अध्यात्म व ऐहिकता, प्राचीनता व आधुनिकता यांचाहि त्यांच्या तत्त्वज्ञानांत अनुपम समन्वय करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्यामतें ऐहिकता व त्यांतून उद्भवणारा सुखवाद हें ध्येय व आदर्श होऊं शकत नाहीं. ऐहिक सुखवर्धन हें ध्येय मानूनहि आचार्य आदर्शनिष्ठ राहिले. वास्तव आणि आदर्श यांचा समन्वय आणि एक गाढ मानवप्रेम यांचा आधार घेऊन आचार्यांनीं अध्यात्मवादाचें एक नवीन दर्शन बनविलें आहे. अध्यात्माच्या परिभाषेंत वेष्टिलेला तो भौतिकवादच दिसत असला तरी त्याचा कल वास्तवापेक्षां आदर्शाकडेच किंवा विश्वात्मक चित्-तत्त्वाकडे जास्त आहे. मानवाचें मन, आत्मा व प्रकृति यांचें स्वरूप याबद्दलची आचार्यांची भूमिका अध्यात्मवादीच वाटते.

पण मुळांत असा प्रश्न विचारतां येतो व विचारणें योग्य होईल कीं मानवाची सनातन प्रकृति एकेरी कां मानावी ? सत्यान्वेषक तशीच भ्रमात्मक बुद्धि, प्रेममय तशीच द्वेषमत्सरानेंहि ग्रस्त भावना, आणि स्वार्थप्रेरित तशीच त्यागप्रेरित कृतिप्रणवता अशा द्वंद्वांनीं मानवी मन घटित झालेलें आहे, असें कां मानूं नये ? देवदानवांचें एकप्राण असें द्वंद्वच मानवी मनांत सनातन आहे, हें तत्त्व मानणें योग्य नाहीं काय ? मानवजातीनें निर्माण केलेल्या देवासुरकथा, धर्म, सामाजिक जीवन आणि सामान्य व्यक्तींचें आणि महान् विभूतींचेंहि जीवनचरित साकल्यानें पाहतां आणि आधुनिक मानसशास्त्राच्या प्रमेयांकडे पाहतां मानवाची प्रकृति मुळांत शुद्ध न मानतां द्वंद्वात्मक मानावी लागते.

शेवटीं आचार्यांच्या विचारांचें व कार्याचें मूल्यमापन करतांना त्यांची समन्वयकाराची भूमिका फारच मौल्यवान् आहे हें मान्य करायला हवें. कारण हल्लीं केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर एकंदर भारतांतहि आधुनिक विचारांचे अभिमानी हे भारतीयत्वापासून वंचित झालेले आढळतात, तर उलटपक्षीं, भारतीय परंपरेचे अभिमानी आधुनिक विचारांना पाठमोरे झालेले दिसतात. भारतीय संस्कृतीचें दृढत्व, विचारांचें प्रौढत्व व स्तिमित करणारी विविधता लक्षांत घेतां आणि आधुनिक जगांत निर्माण झालेल्या विचारसंघर्षांचें स्फोटक सामर्थ्य पाहतां आधुनिक भारतीय विचारांच्या रचनेंत नव्याजुन्यांमध्यें पडलेली दुरभिमानाची खाई एकप्रकारें अटळ व अनुल्लंघनीय वाटूं लागते. परंतु आचार्यांनीं आपल्या समन्वयाच्या तत्त्वाच्या मदतीनें त्या खाईला ओलांडण्यासाठीं समन्वयसेतु बांधण्याचा भगीरथ प्रयत्न केलेला आढळतो.

राजा राममोहन रॉय यांना आचार्यांनीं एकोणिसाव्या शतकांतील ‘ आधुनिक भारतीय ’ असें गौरवानें म्हटलें आहे. त्याच अर्थानें भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचें व स्वातंत्र्यप्राप्तीनंतरच्या सर्वांगीण मुक्ततेच्या लढ्याचें मार्गदर्शन करणारे आचार्य जावडेकर हे ‘ आधुनिक भारतीय ’ आहेत असें आपण अभिमानानें म्हणूं शकूं. ज्ञान, प्रेम, आणि कृति यांना वास्तव आणि आदर्श यांच्या आधारानें शुद्धतम ठेवण्याचा त्यांचा संदेश आपण सर्वांनीं हृदयांत बाळगणें, व तो कृतींत उतरविणें, हीच त्यांना खरीखुरी श्रद्धांजली होईल.

---





अनुक्रमणिका

प्रा. अ. मि. शहा

# ग्रामदान--एक मूल्यमापन : १ :

इंग्रजी राजवटीविरुद्ध राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ चालूं असतांना पुनर्निर्मितीच्या प्रश्नांवर खोलांत जाऊन विचार करावयास त्यावेळचे नेते सहसा तयार नसत. आजहि बहुंशीं तशीच परिस्थिती दिसून येते. नियोजन, शिक्षण, जातीयवाद, खेड्यांतील पुनर्रचना, इत्यादि प्रश्नांवर प्रदर्शित केल्या जाणाऱ्या विचारांत विचारापेक्षा भावनेचेंच दर्शन प्रामुख्यानें घडतें. प्रत्येक गोष्टीच्या तपशिलांत जाऊन तिचे संभाव्य परिणाम शोधूं पाहणारे लोक काळाचें आव्हान स्वीकारूं शकणार नाहींत. फार विचार केल्यानें भावनांचा जोम कमी होऊन कृतीला आळा बसतो, म्हणून तात्त्विक कीस काढीत बसण्यांत अर्थ नाहीं; हेतु शुद्ध असला कीं झालें --असा समज या देशांतील राजकीय व वैचारिक क्षेत्रांतील अनेक पुढाऱ्यांच्या ठिकाणीं दिसून येतो. हा समज होण्याचें एक महत्त्वाचें कारण ज्या पार्श्वभूमींत लढाऊ राष्ट्रवादाचा या देशांत उगम व विकास झाला त्यांत आहे, असें वाटतें. त्यामुळें 'कृति' या शब्दाला येथें एक विशिष्ट व संकुचित अर्थ प्राप्त झाला आहे. ' कृति ' म्हणजे तत्काल फल देणारी, व म्हणून सामान्यतः राजकारणी किंवा राजकीय स्वरूपाची क्रिया. अशा कृती करितां काटेकोर विचाराचा विशेष उपयोग नाहीं-किंबहुना त्याची अडचणच होण्याचा संभव अधिक! आणि म्हणूनच कीं काय, आपल्या राष्ट्रजीवनांत एखादा महत्त्वाचा व गुंतागुंतीचा प्रश्न उपस्थित झाला कीं एखाद्या प्राणिसंग्रहांतील अस्वलांप्रमाणें काहीं ठराविक खेळ आपण सुरू करतो. इंग्रजी भाषेच्या उच्चाटनाचा प्रश्न गेल्या दहा वर्षांत ज्या रीतीनें आपल्या देशांत हाताळला गेला आहे तिकडे पाहिलें कीं आपल्या या ' राष्ट्रीय ' स्वभाववैशिष्ट्याचा एक वादातीत पुरावा मिळेल, असें म्हणावयास हरकत नाही.

ग्रामदानाच्या बाबतींत तसेंच घडलें आहे, असें प्रस्तुत लेखकाला वाटतें. कांही वर्षांपूर्वी राजकीय पक्ष व पक्षीय राजकारणापासून अलिप्त असलेले विचारवंत भूदानाला दुरूनहि स्पर्श करावयास तयार नव्हते. आज त्यांतले बरेचसे लोक विनोबांचे भक्त झालेले दिसतात. भूदानापेक्षां ग्रामदानांत सामूहिक मालकीच्या तत्त्वावर जास्त भर आहे, हें खरें; भूदान चळवळ ही एक ' आरोहण ' क्रिया आहे व ग्रामदान हें भूदानाचेंच पुढचें पाऊल आहे, हें हिं कदाचित् त्यावेळीं स्पष्ट दिसत नसेल. परंतु ही चळवळ केवळ जमिनीचा प्रश्न सोडविणें एवढ्या मर्यादित हेतूनें चालविलेली नाही, तर तिच्या मागें एका समग्र जीवनदर्शनाची प्रेरणा आहे असें विनोबानीं अनेकदां निक्षून सांगितलेलें आहे. ग्रामदानानें शेतीचा प्रश्न समाधानकारकपणें सुटेल की नाहीं, तें नंतर पाहूं. परंतु या चळवळीमागील जीवनदर्शनाबद्दल कांही न बोलतां तिचा पुरस्कार करणें म्हणजे त्या जीवनदर्शनाचाहि पुरस्कार करणें,असा निष्कर्ष निघतो. ग्रामदान चळवळीला अभिप्रेत असलेलें तत्त्वज्ञान मान्य नसतांना तिला पाठिंबा देण्यांत राजकीय पक्षांचे कांही शुद्ध हेतूहि असतील. परंतु विचारवंतांवर राजकीय हेतूंचा आरोप करणें अन्यायाचें ठरेल. म्हणून त्यांच्या विचारांत कोठेंतरी दोष असला पाहिजे, असें म्हणणें भाग पडतें. कारण, एकीकडे आधुनिक

तंत्रविद्येच्या पायावर व यंत्रोत्पादक उद्योगांना अग्रस्थान देणारें आर्थिक नियोजन; व दुसरीकडे अशा प्रकाराचें नियोजन व त्या नियोजनाचा राजकीय संदर्भ, म्हणजे संसदीय लोकशाही, हीं दोन्हीं व्यक्तिस्वातंत्र्यालाच नव्हे तर मानव्यालाहि बाधक आहेत असें प्रतिपादन करणारी ग्रामदान चळवळ – या दोघांना एकदम पाठिंबा देऊन विचारांचें संवादित्व ठेवतां येईल, असें वाटत नाही.

## विसंवाद हें एक जुनें वैशिष्ट्य

हें विसंवादित्व भारतीय राजकारणाचें एक वैशिष्ट्य आहे, असें म्हटलें तर चालेल. त्याचें ऐतिहासिक कारण शोधावयाचें असेल तर टिळकांच्या काळापर्यंत जावें लागेल. लढाऊ राष्ट्रवादाच्या राजकीय गरजांमुळे पश्चिम युरोपांत कांहीं शतकांत उदयास आलेलें, विज्ञानाबरोबर विकास पावलेलें व व्यक्ति हीच अंतिम मूल्य असें समजणारें इहलोकपर (seculer) जीवनदर्शन या देशांत सुशिक्षित लोकांतसुद्धां मूळ धरूं शकलें नाहीं. पाश्चात्य तंत्रविद्येचा स्वीकार होण्यास तशी कांहीं अडचण नव्हती. परिणामीं आज आपलें भौतिक जीवन आधुनिक तंत्रविद्येच्या पायावर उभारलें जात आहे. परंतु ही प्रक्रिया व्यक्तिस्वातंत्र्याला धोका ठरूं नये म्हणून आवश्यक असणारी हमी – म्हणजे सांस्कृतिक जीवनांत दृढमूल झालेली लोकशाही परंपरा व अशा परंपरेला पोषक असें विज्ञानाधिष्ठित, इहलौकीय, मानवतावादी जीवनदर्शन – अजून भारतीय समाजांत दिसत नाही. सर्वसामान्य भारतीयाचें जीवनदर्शन अजूनहि औपनिषदीय विश्वदर्शनावर उभारलेलें व रूढ अर्थानें आध्यात्मिक असें आहे. भौतिक परिस्थिति आधुनिक व सांस्कृतिक संदर्भ जुना, अशी ही आपल्या राष्ट्रजीवनांतील विसंगति आहे. प्रा. प्रधानांनीं आपल्या लेखांत (**नवभारत**, जानेवारी १९५८) दाखविलेलीं ग्रामदान चळवळींतील मतमतांतरें बऱ्याच अंशीं या विसंगतीचींच प्रतीकें आहेत, असें वाटतें.

## सर्वोदयाची समीक्षा : कांहीं निकष

ग्रामदान चळवळ ही सर्वोदयी जीवनदर्शनाचाच एक आविष्कार असल्यामुळें तिचा केवळ शेतीविषयक प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीनें विचार करून चालणार नाही. या जीवनदर्शनांत मनुष्यजीवनाच्या प्रत्येक महत्त्वाच्या प्रश्नावर स्पष्ट विचार आहेत. राज्यसंस्था, अर्थव्यवस्था, शिक्षण, कौटुंबिक संबंध, प्रजासंख्या, इत्यादि जटिल समस्या सर्वोदयी तत्त्वज्ञानांत एका विशिष्ट परंतु सुसंगत रीतीनें सोडविल्या आहेत. म्हणून ग्रामदानाचें परीक्षण करतांना सर्वोदयी तत्त्वज्ञानाचेंहि परीक्षण केलें पाहिजे, तशा परीक्षणास लागणारे निकष स्पष्टपणें मांडले पाहिजेत. हे निकष परीक्षकाला स्वतःला मान्य असणाऱ्या तत्त्वज्ञानांतूनच निर्माण होणार, हें उघड आहे. प्रस्तुत लेखकाला मान्य असलेलें तत्त्वज्ञान थोडक्यांत नवमानवतावादी म्हणून संबोधतां येईल. तांत्रिक स्वरूपाचे मतभेद सोडले तर हें तत्त्वज्ञान विज्ञानानें उपलब्ध करून दिलेल्या ज्ञानावर उभारलेलें, विज्ञानाची कार्यपद्धति हीच नवीन ज्ञान मिळविण्याचा एकमेव विश्वासार्ह मार्ग आहे असें समजणारें, ऐहिक, भौतिकवादी व व्यक्तिस्वातंत्र्यवादी आहे, असें म्हणतां येईल. या तत्त्वज्ञानानुसार शरीरापासून वेगळा असा आत्मा नाही; ज्ञेय विश्व त्यांत अंतर्भूत असलेल्या नियमांनुसार चालतें, त्याचा कोणी कर्ता किंवा नियंता नाही; मानवी जीवनाचें श्रेय, हें जीवन मनुष्याच्या शारीरिक व आध्यात्मिक (म्हणजे बौद्धिक, नैतिक सौंदर्योपभोगात्मक, इत्यादि) शक्तींचा सुसंवादी विकास होईल अशा रीतीनें जगण्यांत आहे, कर्मबंधनांतून मुक्त होण्याचा खटाटोप करण्यांत नाही. असा सर्वांगीण विकास प्रत्येक व्यक्तीला जास्तीत जास्त प्रमाणांत शक्य व्हावा म्हणून नीतिमूल्यांना प्रतिष्ठा

आहे. नैतिक मूल्यांची उत्पत्ति मनुष्याची शरीर-रचना, त्याचें समूहशीलत्व (gregariousness) व परस्परावलंबित्व, आणि त्याच्या मनाची घडण यांत शोधली पाहिजे. मनुष्याच्या मूलभूत भौतिक व आधिभौतिक गरजा सारख्याच असल्यामुळे नैतिक मूल्यांना एका प्रकाराचें दिक्कालातीतत्व लाभलेलें आहे. त्याकरितां दैवी उपपत्ति शोधून काढण्याची गरज नाही. आणि विश्लेषणाच्या सोईकरितां जरी मनुष्यजीवनाचे वेगवेगळे पैलू कल्पिले तरी शेवटीं सबंध मनुष्य हाच एकम् ( unit ) असल्यामुळे त्याच्या भौतिक व आधिभौतिक अंगांची एकमेकां-पासून फारकत करतां येत नाही व त्यांच्यामध्यें एका विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे जाऊन वरखाली असा क्रमहि लावतां येत नाही. व्यक्तीपेक्षां कोठलेंहि श्रेष्ठ मूल्य नसल्यामुळे तिचा सर्वांगीण विकास हा प्रत्येक सामाजिक संस्थेचा निकष ठरतो. आणि मनुष्या-शिवाय दुसरी कोठलीहि सर्जनशील शक्ति या विश्वांत नसल्यामुळे तोच सर्व संस्कृतीचा निर्माता व भोक्ता आहे. म्हणूनच त्याची जबाबदारीहि फार मोठी आहे.

### ग्रामदान व शेतीचा प्रश्न

ग्रामदान चळवळीचें मूल्यमापन वर थोडक्यांत विशद केलेल्या दृष्टिकोनांतून करण्याचा येथें प्रयत्न केला आहे. या चळवळीचा उगम शेतीच्या प्रश्नां-तून झाला. या प्रश्नाच्या महत्त्वामुळेच सर्वोदयी जीवनदर्शन मान्य नसतांना अनेक विचारवंत व राजकीय पुढारी तिला पाठिंबा देत आहेत असें वाटतें. म्हणून ग्रामदानानें आपला शेतीचा प्रश्न सुटूं शकेल का, याचा अगोदर विचार करण्याचें ठरविलें आहे. या प्रश्नाचीं कांही महत्त्वाचीं अंगें म्हणजे : प्रजासंख्या मोठी व उपलब्ध असलेले इतर रोजगार थोडे, आणि म्हणून अपुरी पडणारी शेतजमीन; शेतकऱ्यांच्या गरिबीमुळे व अज्ञानामुळे श्रमाच्या मानानें शेतींतून मिळणारें उत्पन्न फार कमी; शेतकऱ्याला आर्थिक, तांत्रिक व शैक्षणिक मदत करणाऱ्या संस्थांचा जवळ जवळ संपूर्ण अभाव; आणि आर्थिक स्थैर्य व शिक्षण नसल्यामुळे भौतिक व सांस्कृतिक दृष्ट्या भकास झालेलें जीवन. ग्रामदानानें हा बहुविध प्रश्न सुटेल असा दावा केला जात आहे. लागवडीखाली येऊं शकणाऱ्या जमिनीला काहीएक कमाल मर्यादा असल्यामुळे शेतीचा प्रश्न सोडविण्याकरितां तिची उत्पादनक्षमता वाढविणें हें प्रथम कर्तव्य ठरतें. म्हणून ग्रामदानानें हें घडवून आणतां येईल का, या प्रश्नाचें उत्तर शोधलें पाहिजे. या संदर्भात ग्रामदानाचें वैशिष्ट्य शेतीच्या सहकारी किंवा सामुदायिक तत्त्वावर दिलेला भर, असें म्हणतां येईल. विनोबा व त्यांच्या मताचे कार्यकर्ते सामुदायिक शेतीवर भर देत नाहीत हें खरें आहे. परंतु प्रत्येक चळवळीला काही विशिष्ट गतिनियम असतात. सबंध समाजाची एक नवीन घडी बसवूं पाहणाऱ्या चळवळीचे प्रणेते प्रेषितांच्या सारखे असतात. परंतु अशी चळवळ एका मर्यादेच्या पलीकडे गेल्यावर तिचीं सूत्रें तिच्या जनकाच्या हातांत न राहतां, ज्यांच्या अंगीं संघटकवृत्ति व संघटनशक्ति असतात त्यांच्याकडे जाण्याचा संभव असतो. असें होणें स्वाभाविक आहे, आणि या प्रक्रियेंतूनच पक्षांतील अधिकारशाही ( Party bureaucracy ) चा उद्भव होतो. बुद्ध, खिस्त, मार्क्स, गांधी, इत्यादि महान् नेत्यांनीं सुरू केलेल्या चळवळींचा इतिहास वरील विधानास साक्ष देतो. ग्रामदान चळवळीच्या बाबतींत यापेक्षां वेगळें घडेल असें समजावयास आजतरी कारण दिसत नाही. विनोबानीं घोषित केलेलें तंत्रमुक्तीचें तत्त्व केवळ त्यांना संघटनकार्याच्या जबाबदारींतून मुक्त करेल एवढेंच. विशेषतः ग्रामदान चळवळीचा चळवळ्या ( agitational ) भाग जवळजवळ संपला असल्यामुळें आतां तिचें खरें कार्य नवीन ग्रामदानें मिळविण्यापेक्षां ( नवीन खेडीं ग्रामदानांत








मिळण्याचा संभव उत्तरोत्तर कमी होत चालला आहे, असें दिसूं लागलें आहे ) मिळालेल्या खेड्यांत नवीन समाजाची निर्मिति करून दाखविण्यांत राहील. आणि या कार्यात प्रा. प्रधान यांनीं आपल्या लेखांत उल्लेख केलेले विधायक कार्यकर्ते व तज्ज्ञमंडळी यांची भूमिकाच मान्य होण्याचा संभव अधिक आहे. कारण ज्या जनतेच्या जीवनविकासाकरितां ही चळवळ सुरू करण्यांत आलेली आहे त्या जनतेच्या मानसिक प्रक्रियाहि लक्षांत घेतल्या पाहिजेत. आज लोक दारिद्र्यानें पिचून गेले असल्यामुळें जीवनाचा विकास म्हणजे भौतिक गरजा भागणें असेंच त्यांना तीव्रतेनें वाटतें, व या गरजा सुलभतेनें भागविण्यासाठीं जी चळवळ उपयुक्त ठरेल त्या चळवळीबद्दल त्यांना आत्मीयता वाटते. म्हणूनच ग्रामदानाचा शेतीच्या संदर्भात विचार करतांना सामुदायिक शेतीवर लक्ष केंद्रित केलें आहे.

## सामुदायिक शेतीचा अनुभव

सहकारी अगर सामुदायिक पद्धतीनें शेती केली कीं शेतीची उत्पादनक्षमता हटकून वाढते या मान्यतेला पुरावा नाही. याबाबत जगाच्या पाठीवरील शास्त्रीय पद्धतीनें केलेल्या एकमेव प्रयोगाचा उल्लेख करणें उद्बोधक ठरेल. शेतवहिवाटीच्या पद्धतीचा शेतीच्या उत्पन्नावर होणारा परिणाम पाहण्यासाठीं 'इंडियन कौन्सिल ऑफ् ॲग्रिकल्चरल रिसर्च' (Indian Council of Agricultural Research) या संस्थेच्या वतीनें पूर्वीच्या बडोदें संस्थानांत स. १९४६ पासून एक प्रयोग केला गेला. या प्रयोगांतून उपलब्ध झालेली माहिती खाली दिली आहे.*

| गांव | शेतवहिवाटीचा प्रकार | ३ वर्षांतील एकरी सरासरी नक्त नफा |
|---|---|---|
| १ | मालकी हक्क | ९८–३–० |
| २ | कायम कूळ | ६४–८–० |
| ३ | सामुदायिक | ५६–३–० |
| ४ | सहकारी | २९–८–० |

वरील चारहि गटांतील क्षेत्र प्रत्येकी ३५३ एकर असून, प्रत्येक गटांत ३० शेतकरी कुटुंबें शेती कसत होतीं, एकाच प्रकारचीं पिकें घेतलीं होतीं, व वरील पैकीं प्रत्येक गटाला शक्य ती सर्व तांत्रिक मदत देण्यांत आली होती. या प्रयोगाबाबत पुढील वर्षांचा तपशील उपलब्ध नाही. अर्थात्, "जितक्या मोठ्या प्रमाणावर शेतकी करावी तितका तिच्यापासून एकरी जास्त नफा सुटतो", असें पाश्चात्य शेतीअर्थशास्त्रज्ञांचें व शेतीव्यवस्थापन-शास्त्रज्ञांचें मत असल्यामुळे याबाबत थोडा जास्त विचार करणें जरूर आहे. कारण पाश्चात्य देशांत भारतापेक्षां एकरी जास्त उत्पादन निघतें व ती शेती मोठ्या प्रमाणावर मालकी हक्कानें, कुळ-वहिवाटीनें, सहकारीरीत्या किंवा सामुदायिक म्हणून केली जाते, या गोष्टींचा नीट उलगडा न झाल्यानें आपल्या देशांतील तज्ज्ञहि मोठ्या प्रमाणावर शेती-(large-scale farming) चा हिरिरीनें प्रचार करीत आहेत. असें वाटतें.

याबाबत प्रथमच एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं भारताप्रमाणेंच किंबहुना भारतापेक्षांहि लहान प्रमाणावर व बहुंशीं मानवीश्रमावरच जपानी शेती केली जाते. व तेथील सरासरी एकरी उत्पादन भारतापेक्षा जास्त आहे. इतकेंच नव्हे तर त्या पद्धतींत जरूर त्या सुधारणा करून आपल्याकडे प्रचारांत आणलेल्या "जपानी भातशेती"नें एकरी उत्पादनाबाबत जागतिक विक्रम प्रस्थापित केलेला आहे. तसेंच, ज्या वेळीं एकाच जमिनींत एकाच प्रकारचें पीक वर्षानुवर्षे घेतलें जातें तेथें उत्पादन घटतें; खतें, मशागत, वगैरेंचा सघन (intensive) वापर करून तें वाढवितां येतें; व आर्थिक दृष्ट्या तें लहान शेतांत करणेंच जास्त सोयीचें पडतें. पाश्चात्य

* Indian Farming, December 1950

देशांतहि याबाबत असाच अनुभव असून अशा शेतीला तेथें शेती ( farming ) न म्हणतां बहुधा बागायत ( market-gardening ) म्हणतात. हा बारकावा लक्षांत न घेतां, पाश्चात्य शेती–( farming ) ची व आपल्या शेतीची तुलना करून तिकडील आडाखे व निष्कर्ष आपल्या शेतीला लावण्याचा जो प्रयत्न करण्यांत येतो तो चुकीचा होय. परदेशांतील शेतीवर स्वतः काम करून व तेथील शेतीविषयक परीक्षेंत पहिल्या क्रमांकानें उत्तीर्ण होऊन आलेल्या एका मित्रानें दिलेली माहिती या संदर्भात बोधप्रद आहे. पाश्चात्य शेतींत कोणत्याहि एका वर्षी सर्व क्षेत्रावर मिळून निर्माण केल्या जाणाऱ्या उत्पादनाचें जर food–calories मध्यें रूपांतर केलें तर सध्याच्या निकृष्ट शेतींतील भारतीय किसानानें तितक्याच क्षेत्रांवर मिळविलेल्या उत्पादनाच्या food-calories पेक्षा तें जास्त तर राहोच परंतु कदाचित् कमीच मोजमाप भरेल. या गोष्टीचें मुख्य कारण म्हणजे पाश्चात्य देशांतील शेतींत पिकांच्या फेरपालटपद्धतींत आहे. त्यांच्या फेरपालटपद्धतींत कुरण– Ley, Silage, Seeds, etc– व इतर वैरणीचीं पिकें — Oats, Roots, etc.— यांना फार महत्त्वाचें स्थान आहे. या सर्वांचा दुभत्या अगर कसायाच्या जनावरांच्या खुराकासाठीं उपयोग करून त्यापासून मिळणारें शेण, काडीकचरा, इत्यादि सर्व त्या जमिनींतच घातलें जातें, त्यामुळें या सर्व पिकानंतर चार-सहा वर्षांनीं एकदाच घेतल्या जाणाऱ्या अन्नपिकाचें उत्पादन जास्त येतें. ग्रामदानी गांवापुरतेंच बोलावयाचें झालें तर सध्याची पद्धत सोडून या पद्धतीचा अंगीकार केल्यास सध्या पिकाखालील असलेल्या जमिनीचा फक्त ⅕ भाग पिकाखाली आणणें शक्य होईल. त्या तेवढ्या क्षेत्रांत एकरी दुपटी-तिपटीनें अन्न पिकलें तरी अन्नाचें एकूण उत्पादन फारच कमी होईल व निम्म्या गांवाला पोटापाण्याची सोय बाहेर बघावी लागेल.

### डेन्मार्कमधील शेती

पाश्चात्य देशांतहि, मोठ्या प्रमाणावर शेती केली तर एकरी उत्पादन वाढेल, हें मत सर्वमान्य नाही. प्रामुख्यानें शेतीप्रधान असूनहि इतर देशांइतकेंच चांगलें जीवनमान असलेल्या डेन्मार्क या छोटेखानी देशांत मोठ्या शेतांचे एक कुटुंब कसूं शकेल एवढे लहानलहान तुकडे पाडून ते लायक इसमांना देण्यांसंबंधीचे कायदे गेल्या शतकाच्या शेवटापासून डेनिश लोकसभेनें केलेले आहेत. प्रत्यक्षांत सरकारीरीत्या आजतागायत अशीं २५००० नवीन शेतें ( holdings ) जुन्या इस्टेटींतूनच निर्माण केलीं आहेत. उत्पन्नाच्या बाबतींतसुद्धां लहान शेतें आघाडीवर आहेत. दहा हेक्टरापेक्षा लहान शेताचें नक्त उत्पन्न एका हेक्टरला ८२४ क्रोन पडत असून, उतरत्या क्रमानें कमी कमी होऊन १०० हेक्टरापेक्षा मोठ्या शेताचें उत्पन्न एका हेक्टरला ४८६ क्रोन आहे. तसेंच दहा हेक्टरापेक्षां लहान असलेल्या शेतांत हेक्टरामागें ४१४६ फीड-युनिट ( feed-units ) जनांवरांचा खुराक पिकविला जातो; उतरत्या क्रमानें कमी होत जाऊन १०० हेक्टरापेक्षा मोठ्या शेताकरितां ही संख्या ३१२५ फीड-युनिट आहे. तशीच गोष्ट दुधाच्या उत्पादनाची आहे. वर उल्लेख केलेल्या दहा हेक्टरापेक्षा लहान असलेल्या शेतांचा सरासरी आकार ६·७ हेक्टर ( म्हणजे १५-१६ एकर ) असून सर्व जमिनींत वर्षाला एकच पीक घेतलें जातें, व त्यांतहि सरासरी पांच एकर पाळीपाळीनें गवताखाली असतात.

### गैरलागू दृष्टिकोण

मोठ्या प्रमाणावरील शेती किफायतशीर पडते असें ज्यावेळी पाश्चात्य कृषितज्ञ सांगतात त्यावेळी ते धंद्याच्या दृष्टीनें सुटणाऱ्या भांडवली नफ्याबाबत बोलत असतात. अशी शेती किफायतशीर होण्याची

त्यांनी दिलेली कारणमीमांसा इकडील परिस्थितीला क्वितपत लागू पडते, हें आपण पाहिलें पाहिजे. या बाबतचा पहिला मुद्दा म्हणजे मोठया प्रमाणावर शेती केली तर एकूण मजूरीच्या व भांडवली खर्चांत बचत होऊन शेतीच्या नफ्यांत वाढ होते, हा होय. आपल्याकडे असलेल्या ग्रामीण बेकारीचा विचार करतां याप्रमाणें नफ्यांत वाढ करणें निदान ग्रामदानी गांवाना तरी परवडण्यासारखें नाही. दुसरें असें कीं, चालू व भांडवली खर्चांत बचत करण्याकरितां तंत्रज्ञ व्यवस्थापकाच्या सल्ल्याची गरज असते. असा तंत्रज्ञ सल्लागार मिळाल्यास मोठया प्रमाणावर शेती न करतांहि सध्याच्या प्रमाणाचाच थोडाफार विस्तार करून हा फायदा मिळविणें शक्य आहे. त्यासाठीं सर्व शेती एकवटण्याची गरज नाहीं.

आपल्या शेतीची सुधारणा करण्याकरितां खरी गरज आहे ती पाणीपुरवठा, चांगलें बीबियाणें, यंत्रसामुग्री घेण्यासाठीं आर्थिक मदत, इत्यादि गोष्टींची – शेतीचा आकार वाढविण्याची नाही. शेतकऱ्याला या सवलती उपलब्ध करून देण्याच्या कामीं सामूहिक शेतीचा काहीहि उपयोग नाही, उलट नुकसान होण्याचा संभव आहे. कारण, शेतींतील कामाचें शास्त्रीय मोजमाप करण्याची पद्धति अजूनहि उपलब्ध नसल्यानें, व 'सर्वांचें काम तें कुणाचेंच नाही' अशी सर्वसामान्य प्रवृत्ति असल्यामुळें, मोठ्या प्रमाणावरील शेतींत चुकार माणसांचें फावेल आणि त्याची परिणती एकूण उत्पादन कमी होण्यांत होऊन, रहाणीचें मान सध्यापेक्षाहि खाली जाईल.

### पदयात्रेंतील अनुभव

या संदर्भांत गेल्या आक्टोबर महिन्यांत शिरूर तालुक्यांत काढण्यांत आलेल्या पदयात्रेंतील अनुभव लक्षांत घेण्यासारखा आहे. प्रस्तुत लेखक श्री. एस्. एम्. जोशी व श्री. शिरूभाऊ लिमये यांच्या बरोबर दोन दिवस मुखई व जातेगांव या गांवीं होता. प्रजा-समाजवादी पक्ष व जोशी-लिमये याच्याबद्दल आपुलकी बाळगणारे शेतकरीसुद्धां ग्रामदानाला तयार नव्हते. आपल्या जमिनीचा कांही भाग गांवांतील भूमिहीनांना देण्यास ते तयार होते. भूदानाच्या मागणीमागील भावना व भूमिका त्यांना समजूं शकत होती. तसेंच दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत ग्रामीण जनतेकरितां काय योजिलें आहे, तें समजून घेण्याची त्यांची उत्कंठा होती. एवढेंच नव्हे तर आदल्या दिवशीं ग्रामदानाच्या मागणीमुळें गढूळ व कांही अंशी विरोधी झालेलें वातावरण दुसऱ्या दिवशीं पंचवार्षिक योजनेवर श्री. जोशी यांच्या भाषणामुळें परत एकदा निर्मळ झालें. ग्रामदानाची कल्पना मात्र शेतकऱ्यांच्या गळीं उतरविण्याचें कार्य खुद्द जोशींनांहि जमलें नाही. ग्रामदान केल्यानेंच पाणीपुरवठ्याचे, यंत्रसामुग्रीसाठीं लागणाऱ्या कर्जाचे, तांत्रिक माहिती मिळविण्याचे व शेतीचें उत्पादन वाढविण्याचे, इत्यादि प्रश्न कसे सुटतील या त्यांच्या प्रश्नाला सहज पटण्यासारखें उत्तर ग्रामदानप्रचारास गेलेल्या मंडळीकडे नव्हतें. ग्रामदानानें जर सहज दिसणारा फायदा कांही होणार नसेल व उलट कांही चुकार माणसांचेंच बरें होणार असेल तर जमिनीवरचा मालकीहक्क कां विसर्जन करावा, हें शेतकऱ्याला समजणें अवघड गेलें तर त्याबद्दल त्याला दोष देतां येत नाही. त्याचे प्रश्न वेगवेगळ्या प्रकारच्या सहकारी सोसायट्या (service co-operatives) स्थापून सुटण्यासारखे आहेत. परंतु अशा सोसायट्या कार्यक्षम व निःपक्षपाती रीतीनें चालविण्यास लागणारें अर्थबळ व मनुष्यबळ आज आपल्याकडे नाहीं. खेड्यांतील पुढारीवर्ग अनेकदां खाजगी हेव्यादाव्यांत गुंतलेला असतो, व प्रामाणिक काम करूं इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यांच्या ठायींसुद्धां शेतीकडे आधुनिक उद्योग म्हणून पाहण्याची दृष्टि सहसा नसते. आजसुद्धां अनेक खेड्यांत उत्तम












शेती करून त्यावर पैसा मिळविणारे काही शेतकरी असतात. त्यांच्या यशाची शास्त्रीय कारणमीमांसा करून, त्यांचें अनुकरण दुसरे शेतकरी कसे व कोठपर्यंत करूं शकतील याचा अभ्यास झाल्यास त्याचा फार मोठा उपयोग होईल. इंजिनियरिंगच्या विषयांत आज जसे लहानलहान डिप्लोमा कोर्स आहेत तसे कोर्स शेतकीच्या विषयांत अनेक ठिकाणीं काढून खेड्यांतील काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचें शिक्षण झालें पाहिजे.

## नव्या आंदोलनाची गरज

हें कार्य करण्यास आज कोठलीहि संस्था ( agency ) संपूर्णतः योग्य नाही. ग्रामीण विकासाकरितां असलेली सरकारी यंत्रणा तांत्रिक दृष्ट्या कार्यक्षम असली तरी त्या यंत्रणेंत कार्य करणारीं माणसें ध्येयवादाच्या दृष्टीनें अपूरीं पडतात असें दिसतें. सर्वोदयी कार्यकर्ते ध्येयवादानें प्रेरित असले तरी त्यांचा कर्मठपणा व आध्यात्मिक आव या दोषांमुळें शेतकऱ्याचा विश्वास संपादन करणें त्यांना अवघड आहे. सरकारी यंत्रणेचें तांत्रिक ज्ञान व ग्रामदान चळवळीचा ध्येयवाद यांचा मिलाफ होऊन त्यांचा उपयोग ग्रामीण जनतेचें जीवन केवळ आर्थिकदृष्ट्या नव्हे तर सांस्कृतिक दृष्ट्याहि संपन्न व आनंदी करूं पाहणारी संस्था अस्तित्वांत येण्याची आज गरज आहे. शेतकऱ्याला संत करण्याऐवजीं त्याला राग, लोभ, काम व त्याचबरोबर माणुसकी असलेल्या साध्या माणसासारखें जगतां येईल, आपल्याभोंवताली घडत असलेल्या गोष्टींची संगति लावतां येईल व आपल्या जीवनाचे आपणच शिल्पकार आहोत असा त्याच्याठायीं आत्मविश्वास निर्माण होईल, अशा चळवळीची आज गरज आहे. अशी चळवळ सरकारी मदतीशिवाय अशक्य आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं सरकारी मदत मिळाली कीं काम झालें. परंतु आज आहे त्या स्वरूपाच्या ग्रामदान चळवळीनें तें कार्य होणार नाहीं, असें म्हणावयास हरकत नाहीं.

ग्रामदान चळवळीच्या शेतीविषयक भूमिकेचें इतकें विवरण करण्याचें कारण उघड आहे. शेतीचा प्रश्न जर या चळवळीनें सुटत नसेल तर तिचें महत्त्व एक आदर्श समाजचित्र एवढें राहतें. त्या दृष्टीनें तिचें मूल्यमापन पुढें करूं.*

---



---

* या लेखांत दिलेली तांत्रिक स्वरूपाची माहिती त्यांत उल्लेख केलेल्या एका शेतकीतज्ञ मित्रानें पुरविली आहे. सरकारी नोकरींत असल्यामुळें त्याचें नांव येथें दिलें नाहीं.





## अल्प बचत योजनेंत तुम्ही पैसे गुंतविणें म्हणजे राष्ट्राला मदत करणें व आपलें भवितव्य सुरक्षित करणें होय.



अल्प बचत योजना ही प्रत्येक व्यक्तीसाठीं आहे आणि या योजनेंत पैसा गुंतविणारा प्रत्येक इसम केवळ आपला पैसा सरकारी रोख्यांत गुंतवीत नाहीं तर तो राष्ट्र-उभारणीच्या कार्यांत सहभागी होत असतो. भारताची प्रगति मूठभर व्यक्तींवर अवलंबून नसून श्रम करून आणि बचत करून या महान कार्यांतील आपला वांटा उचलणाऱ्या बहुजन समाजावर ती अवलंबून आहे. नवभारत निर्मितीच्या ह्या प्रचंड कार्यास हातभार लावण्याचा मान आपल्याला मिळाला आहे याबद्दल प्रत्येकास अभिमान वाटला पाहिजे.




या योजनेंत पुढील प्रकारांनीं पैसा गुंतविता येईल (१) पांच रूपये किंवा पांचाच्या पटीतील रकमेइतकी, १२ वर्षे मुदतीची नॅशनल सेव्हिंग सर्टिफिकिटें विकत घेऊन (२) १०० रू. आणि त्याच्या पटीतील रकमेइतकी १० वर्षांच्या मुदतीची ट्रेझरी सेव्हिंग डिपॉझिटें घेऊन. (३) पोस्टांत खातें उघडून किंवा/आणि (४) १५ वर्षे मुदतीची ॲन्युइटी विकत घेऊन.



सविस्तर माहितीसाठीं नजिकच्या पोस्ट ऑफिसांत, जिल्ह्याच्या अव्वल कारकुनाकडे किंवा तुमच्या विभागांतील रीजनल सेव्हिंग्ज् ऑफिसच्या कोणत्याहि अधिकाऱ्याकडे चौकशी करा.

# अल्प बचत योजनेंत पैसे गुंतवा.

मुंब[illegible] सरकारच्या प्रसिद्धी खात्यातर्फे प्रकाशित

## वाचकांचा पत्रव्यवहार

### श्री. संपादक, नवभारत यांस

माझ्या " मनाचें चरित्र " या लेखाच्या उत्तरार्धासोबत पुढील खुलासा प्रसिद्ध करण्याची कृपा करावी.

### ' मनाचें चरित्र ' श्रीपतिदासाचेंच

कै. आजगांवकरांनीं दिलेली ' मनश्चंद्रबोध ' या छापील ग्रंथाची माहिती आढळल्यानंतर छापील पोथी मिळविण्याचा प्रयत्न करूं लागलों. राजाराम कॉलेजमधील तत्पर ग्रंथपाल आणि माझे स्नेही श्री. राऊत यांच्यामार्फत करवीर नगर वाचन मंदिरांतून एक पोथी मिळाली ( क्रमांक २४७६९ ). तिच्यांत बारा अध्याय असून ओंवीसंख्या १०१३ आहे. मात्र शेवटच्या पानावर ' ओवीसंख्या १०११ ' असें म्हटलें आहे.* ' हें पुस्तक मुंबईत काशिनाथ वासुदेव खांडेकर यांणीं जगदीश्वर छा. छा. ' असा निर्देश शेवटच्या पानावर असून कवीचें नांव श्रीनाथदास असें सर्व अध्यायांत आढळतें. येथें ' हरिदास ' हें नांव कोठेंच नाहीं. या प्रतींतहि कवीच्या गुरूचें ' श्रीपति ' हें नांव एका ठिकाणीं ( अ. १ – ओ. २० ) आढळतें. अर्थात्च कवि म्हणून श्रीनाथदास किंवा हरिदास हें नांव कसें पुढें आलें याचें आश्चर्य वाटतें. प्राचीन काळांतील वाङ्मयचौर्याचें हें एक उदाहरण असावें किंवा छापणाऱ्यांची ग्रंथवाचनांत कांहीं चूक झाली असावी. ज्या हस्तलिखितांवरून हे ग्रंथ छापले गेले तीं पहायला मिळाल्याशिवाय याबाबतींत निर्णय देणें कठीण आहे.

या ग्रंथाचें नांव आणि कविनाम यासंबंधीं आणखीहि अन्य पुरावा मिळतो. तंजावरच्या सरस्वती महालांतील मराठी हस्तलिखितांचे जे वर्णनात्मक कोश प्रसिद्ध झाले आहेत त्यांतील पहिल्या भागांत ठोकळ क्रमांक २३५ ते २४२ मध्यें उल्लेखिलेल्या आठहि प्रती प्रस्तुत ग्रंथाच्या असून प्रत्येक क्रमांकांत ' प्रवृत्तिनिवृत्ति संवाद, मनचरित्र – श्रीपतिदासकृत ' असाच उल्लेख आहे. ओवीसंख्या चार प्रतींत ६२८, दोन प्रतींत ६७७ व इतर दोन प्रतींपैकीं एकींत ७२२ व दुसरींत ७७३ अशी नोंदलेली आहे. सहा प्रतींत प्रसंग सात तर दोन प्रतींत सहा आहेत. ' श्रीरामदासी संशोधना'च्या द्वितीय खंडांत ' बाडांक १२०७ ( ३ ) ' मध्यें ' श्रीपतिदासकृत प्रवृत्तिनिवृत्तिसंवादे मनाचें चरित्र-ओवी ७३२ ' असा निर्देश आहे. शिवाय सदर ग्रंथ या याद्यांत दुसऱ्या कोणत्याहि कवीच्या नांवावर आढळत नाहीं.

तेव्हां यापुढें ' मनाचें चरित्र ' हा ग्रंथ श्रीपतिदासाचा म्हणूनच उल्लेखिला जाणें आवश्यक आहे.

— **पां ना. कुलकर्णी**

### ग्रामदान चळवळींतील संभाव्य धोका

### श्री. संपादक, नवभारत यांस

नवभारत–जानेवारी १९५८च्या अंकांतील प्रा. ग. प्र. प्रधान यांचा " ग्रामदान चळवळींतील मतमतांतरें " हा लेख वाचला. पहिल्याच परिच्छेदांत चळवळींकडे पाहण्याचा एक निर्दोष दृष्टिकोन प्रतीत होतो. अभ्यासकाच्या अलिप्त दृष्टिकोनांतूनच लेखकानें श्री. अप्पासाहेब पटवर्धन, श्री. शंकरराव देव, प्रा. धनंजयराव गाडगीळ, श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे व श्री. एस्. एम्. जोशी यांच्या मतांच्या विविध छटांचा घेतलेला आढावा बहुतांशानें अलिप्त, समर्पक आणि मार्मिक आहे.

शेवटीं " नव्या दांभिकतेचा संभव " हा परिच्छेद मात्र लेखकानें या चळवळीसंबंधाचें आपलें स्वतःचें मत थोडक्यांत सांगण्यासाठीं लिहिला आहे.

त्यांत नवा समाज निर्माण करण्याबद्दल त्यांनीं फारसा आक्षेप घेतलेला नाहीं. परंतु माणसाचें अंतरंग बदलणें, आदर्श मानव बनविणें या कल्पनांबद्दल संशय प्रकट करून " नव्या दांभिकतेचा संभव " असल्याबद्दल धोक्याची सूचना दिलेली आहे. व धोका टळावा म्हणून विचारवंतांनीं या प्रश्नाची चर्चा करावी अशी योग्य सूचना केली आहे.

लेखकाच्या मतें, माणसाचे कांहीं शारीरिक व मानसिक विशेष आहेत. त्यांचा विचार न करतां आदर्श मानवाची कल्पना मांडली व त्याच्या आचारधर्माची रूपरेषा सांगितली तर प्रत्यक्षांत ध्येय असाध्य रहाव-

* या छापील पोथीची माहिती दाते-ग्रंथसूचींत नाहीं. A Descriptive Catalogue of the Marathi Manuscripts and Books in the Tanjore Maharaj sarfoji's Sarswati Mahal Library Vol. I.

याचें व आचारधर्माचें अवडंबर माजून नवी दांभिकता मात्र निर्माण व्हावयाची !

ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. "ब्रह्म तिथें माया व बुवा तिथें बाई" हांहि निसर्ग आहे ! व तो ग्रामदान चळवळीलाहि लागू आहे. इतकेंच नव्हे तर जितकी उंची वा उदात्तता अधिक तितका विपर्यास किंवा दांभिकता अधिक, असाच जगाचा अनुभव आहे ! हें त्रिकालाबाधित कटुसत्य आहे, तें संपूर्णपणें टाळणें अशक्य आहे !

म्हणूनच ज्ञानी माणसानें स्वतःस आकलन झालेलें ध्येय ( सत्य ) जगापुढें मांडून तें गांठण्याचा, सामान्य माणसाचें शारीरिक व मानसिक सामर्थ्य लक्षांत घेऊन, शक्य तितका सुगम मार्ग दाखविणें हेंच त्याचें धर्मकार्य ठरतें; विनोबा तसेंच सामान्यांत शिरून कार्य करीत आहेत व अशक्य तें शक्य करून दाखवीत आहेत. विपर्यास होईल म्हणून त्यांनीं ( प्रारंभींच ) अर्धसत्य सांगणें मला उचित वाटत नाहीं. त्यांनीं मांडलेला मांड जसा उदात्त आहे तसाच तो सर्वस्पर्शी आहे. 'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्।' या न्यायानें, इतकेंच नव्हे तर — अपिचेत् सुदुराचारो०। या सिद्धांताप्रमाणें कोणालाहि व कितीहि थोडेसें धर्माचरण करण्यास त्यांनीं पाचारण केलेलें आहे.

सद्धर्माच्या मागें अधर्म, विपर्यास नेहमींच होत असतो. तो खोडून टाकण्यास समान-धर्मा उत्पन्न होतच असतो. जरूर तर अशावेळीं आपद्धर्म ( अर्ध-सत्य ) तो सांगत असतो.

मनुष्याचे शारीरिक व मानसिक विशेष लक्षांत घेऊनहि पुष्कळवेळा म्हणण्याची पाळी येते कीं "मनुष्याचे शारीरिक व मानसिक विशेष" यामध्यें बरेचसे मनुष्याचे "न्यूनगंडच" लपलेले असतात. दीर्घ व चिकाटीच्या प्रयत्नांनीं बरेचसे मानसिक विशेष बदलतात असें विनोबादि संयमी व कृतनिश्चयी पुरुषांकडे पाहून मान्य करावें लागतें. इतिहासाच्या छोट्या "फूटपट्टीनें असलेल्या कांहीं गोष्टी तितक्याशा लक्षांत येत नाहींत, त्यासाठीं मानवी प्राण्याच्या सुदीर्घ इतिहासाची, प्रदीर्घ लांबीची "टेपच" वापरणें आवश्यक आहे.

लेखकानें नव्या दांभिकतेची दिलेली धोक्याची सूचना योग्य व आवश्यक होती. परंतु ती देतांना "धर्माच्या बाबतींत हा अधःपात झालेला आहे" असें म्हणण्याची लेखकानें उतावळी केली असें मला वाटतें.

"नव्या दांभिकतेची संभाव्य धोक्याची सूचना" ग्रामदान चळवळींत पडणारांनीं अवश्य लक्षांत घेण्यासारखी आहे. कर्मठपणापेक्षां नवे नवे विचार आत्मसात करण्याची "मनाची ठेवण" जागृत ठेवणें हें अधिक महत्त्वाचें आहे असें मला वाटतें.

— शिवराम भाऊ तेंडुलकर

## साभार पोच —

**साहित्य :** वार्षिक १९५६– मुं. म. साहित्य संघ, मुंबई ४

**मान्सून :** दत्ता निकम– इंदिरा प्रकाशन, मुंबई ४

**मराठी-फ्रेंच शिक्षक :** एन्. जी. मेहता-नैकात्मा प्रकाशन, पंचवटी

**महाराष्ट्राची ग्रामीण समाजरचना :** वि. म. दांडेकर व म. भा. जगताप, गोखले अर्थशास्त्र संस्था, पुणें ४

# प्रगतीचें आव्हान

दुसरी पंचवार्षिक योजना ही राष्ट्राच्या आशा आकांक्षांचें मूर्तिमंत प्रतीक असून समाजवादी समाजरचनेच्या दिशेनें वाटचाल करणें हें तिचें एक उद्दिष्ट आहे. महत्वाच्या व मोठमोठ्या उद्योगधंद्यांची जलद वाढ करणें, अन्नधान्यें व शेतीचा इतर माल यांच्या उत्पादनांत प्रगति दाखविणें, राष्ट्राच्या उत्पन्नांत अधिक वाढवा कमाविणें; नोकरी-धंद्यांच्या संधीसाठीं व्यापक क्षेत्र निर्माण करणें, राष्ट्राच्या आर्थिक शक्तींची अधिक समतोल वाटणी करणें आणि श्रमाचें व साहसी प्रयत्नांचें चीज करणें यासाठीं या योजनेचा जन्म आहे. आणि ती ज्या समस्या यशस्वी तऱ्हेनें सोडवीत आहे त्या पुढील प्रगतीच्या प्रसववेदना होत. हे एक आव्हान असून, योजना सुफलित करण्यासाठीं आपल्या राष्ट्रानें सर्व शक्ति पणास लावणें भाग आहे. आणि स्वार्थत्याग व सेवा यांच्या आधारावर ते एवढें खचित करूं शकेल.

## योजनेंसह पुढें चला

**प्रगतीसाठीं, उत्कर्षासाठीं.**



"आपल्या राष्ट्राची पुनर्रचना ही एक फार मोठी समस्या आहे. आणि आपण सध्यां ज्या महान् कार्यांत गुंतलो आहोंत त्याला नुसत्या सुसंघटित प्रयत्नांचीच गरज आहे असें नव्हे तर त्याबरोबर उत्साह आणि विजिगीषाही आवश्यक आहेत."

—जवाहरलाल नेहरू



अनुक्रमणिका